भारतीय कर्मकाण्डीय विधि व विज्ञान पुष्प- ५ वें



# देवपूजा विधि व विज्ञान

सचित्र

वैदिक व पौराणिक मंत्र-पंचसूक्तमंत्र-देवे-लघु प्राणप्रतिष्ठा विधि

आरती संग्रह आणि

विधि व सूक्तें यांतील विज्ञान

गो. प्र. भावे



नवज्योति प्रकाशन- मयूर को० हा० सो० ब्लॉक ३, कॉलेज गल्ली,
मुंबई टेलिफोन एक्सचेंज जवळ, दादर-मुंबई २८

# अंतरंग दर्शन ( अनुक्रमणिका )

## पूर्वार्ध–विज्ञान कलिका



## पुस्तकाच्या अंतरंगाकडे

**प्रयोजन**— पश्चिमेकडून येणाऱ्या केवळ भौतिकी व भोगप्रधान विचार-सरणीमुळें, आम्हा भारतीयांच्या संस्कारप्रधान आचार विचारावर मरणप्राय आघात होत आहेत. आगची भारतीय विचार प्रणाली, भौतिकी शक्तीला ताब्यांत ठेवणाऱ्या अतिभौतिकी अशा विश्वशक्तीचें ज्ञान करून देणारी आहे. अशा शक्तीसंबंधें ज्ञान देणारा व आचार विधि साहित्य असणारा वैदिक व

पुरोहित वर्ग पश्चिमेकडून येणाऱ्या विचारधारेशी परिचित नसतो यामुळे त्या दोन्ही विचारप्रणालींचा समन्वय त्यांना जमत नाही.

यामुळें आमच्या नवशिक्षित सामान्यजनमानसात, त्या श्रेष्ठ आचारधर्मा सबधाने प्रथम दुर्लक्ष, नतर उपहास व चालढकल ह्या गोष्टी सुरू झाल्या आणि तसे आचारविचार हे वेडगळपणाचे थोताड आहे असे ठरत आहे. अशा परिस्थितीत जर त्या कर्मकाडाचे नवीन विचारसरणीला पटेल असे स्पष्टीकरण करण्यात आले, तर त्या मरणप्राय आघातातून आमची सध्या धोक्यात आलेली सस्कृति पुन उजळेल व टिकेल, ह्या भावनेनें आमच्या कर्मकाडीय विधिविधानापैकी काहींचा तसा खुलासा करण्याचा हा एक प्रयत्न वैदिक, पुरोहित व सामान्य वाचकवर्ग, ह्यापुढें ठेवण्यात येत आहे सामान्यतः लक्षात येत नाही वा येणार नाही अशा कर्मकाडीय कृतीतील विशेषज्ञानाची कल्पना देणे, या अर्थाने येथें ' विज्ञान ' हा शब्द मुख्यतः उपयोगिलेला आहे

**भारतीय कर्मकाण्डाची मांडणी—** देश, काल, अर्थ व स्थानिक परिस्थिति या सर्व गोष्टी लक्षात घेऊन, आरोग्यावर दृष्टि ठेवून सर्व व्यक्ति व सर्व समाज, तसेच त्यांना उपयोगी अशा जीवानांही, शांति, पुष्टि व तुष्टि कशी मिळविता येईल, व हें कार्य करीत असतांना अतिभौतिक विश्वशक्तीशीं पूर्ण सहयोग कसा साधिता येईल, अशा दृष्टीनें आमच्या कर्मकाण्डातील प्रत्येक कृति व तिला लागणारें साहित्य ह्याची पूर्ण विचारी योजना त्यात केलेली आहे पण तें सर्व वाङ्मय जगश्रेष्ठ अशा ' संस्कृत ' भाषेत आहे व त्या भाषेकडे तर आम्ही नवशिक्षितांचे दुर्लक्ष आहे पण याच्या उलट त्या सस्कृत भाषेतील ज्ञानाकडे पाश्चिमात्य विचारवत मात्र आस्थेने व आपुलकीनें पाहू लागले आहेत. म्हणून आता आपणच आमचे ' जुनें ठेवणें ' पहाणे योग्य व इष्ट आहे, असे पटेल

**पुस्तकाची ठेवण :–** देवपूजा ही गोष्ट सध्यां तरी सर्व सामान्यांना हवीशी वाटते, पण ती आधुनिक विज्ञानी दृष्टींत बसावी अशी त्यांची अपेक्षा दिसते हें ध्यानांत घेऊन सदरहू पुस्तकाचा सपूर्ण पूर्वार्ध ' विज्ञान कलिका ' या नांवानें, आणि सर्व मन्त्र, विधि व तपशील ' विधिकलिका ' या नांवानें दिला आहे.

**विधिकलिकेतील विशेष :–** देवपूजच्या उपलब्ध असलेल्या सर्व पुस्तकामध्यें पुरुषसूक्त तेवढें देतात, पण या पुस्तकात श्रीसूक्त, गणपति अथर्वशीर्ष, संक्षिप्त रुद्र, महिम्नपंचक, हीं दिलीं असून त्याशिवाय देवें, लघुप्राणप्रतिष्ठाविधि, आणि निरनिराळयावेळीं उपयुक्त अशा मुद्रा, या इतरत्र न आढळणाऱ्या गोष्टी दिल्या आहेत

**आकृति विशेष :–** पूजेच्यावेळी आवश्यक अशा आठ मुद्राकृति, श्रीसूक्त यत्र आणि मंत्रजप पद्धतीच्या दोन आकृति, इतक्या आकृति दिल्या असून देवतापचायतनाच्या पाच चित्राकृति, व त्यातील देवतामाडणीतील दिशाचा खुलासा या सर्व गोष्टी इतर कोणत्याच देवपूजा पुस्तकात नाहीत, त्या दिल्या आहेत

**ऋणमोचनः–** मदरहू ग्रंथ ज्या चारपाच वैदिक संहितापाठी सज्जनाच्या दृष्टीखालून गेला, त्यापैकीं विद्याविनोद नारायण शास्त्री ( आजर्लेकर, अनेक वैदिक ग्रयाचे लेखक, उत्तम वैदिक व पुरोहित ) आणि श्री गगाधर शास्त्री दांडये ( पुणें, तज्ञ, आचारशील विद्वान ) ह्या उभयताचा मी फार ऋणी आहे कारण त्यानी माझें ' विज्ञानी ' लिखाण, शालेय गुरुजी विद्यार्थ्यांचे लिखाण तपासितात, तसे, तपासून जरूर तेथें योग्य मार्गदर्शन केलें या पुस्तकातील विज्ञानी दृष्टीची आज फार जरूर आहे, म्हणुन लुप्त होत चाललेल्या इतर कर्मकाण्डीय ग्रयातील विज्ञानी दृष्टीचे असे बरेच ग्रंथ लिहून वाढण्यास आशीर्वादात्मक प्रोत्साहन देणारे श्री सत नाना महाराज तराणेकर ( इंदोर ) यांचा आणि रामदासी बाण्याचे कट्टर हिंदुत्ववादी शुद्धि अध्वर्यु स विश्वनाथजी ( मथुराश्रमवासी ) यानी आमचे बुद्धिवादी सज्जन व पुरोहित वर्ग ह्याना आवर्जून आव्हान देणारा ग्रंथ परीक्षण केले, याबद्दल त्याचाही मी ऋणी आहे तथापि—

' न्यूनातिरिक्त विद्वद्भि–र्शोधितव्यम् '

लेखक

**प्रकाशकांचे निवेदनः—** " सध्याच्या सांस्कृतिक ग्लानीच्या काळात आपल्या शास्त्र, कला विद्या इत्यादींचे उज्जीवन नवीन रीतीने केले नाही तर आपली सनातनी परंपरा उत्सन्न होऊन कोणती तरी परकीय संस्कृति ते स्थान काबीज करील " ह्या उद्गारातील सूचित प्रेरणा ध्यानात घेऊन आम्ही श्री. गो प्र भावे यांच्या सहकार्याने सदरहू प्रयत्न केला आहे. हे विज्ञान मालेतील त्याचे ५ वे पुष्प आहे.

ज्या प्राचीन भारतीय ऋषि मुनींजवळ आधुनिक नवविज्ञानाला चकित करून सोडील इतकी निश्चित व अनुभूत अशी ऋतदृष्टि होती, एवढेंच नव्हे तर त्याचे ते सिद्धांत व बोध आजही सिद्ध व टिकाऊ आहेत. म्हणून ते ' सनातन ' च आहेत, त्या भारतीय ऋषिमुनींच्या आजकालच्या नव भौतिकी विज्ञान धार्ताल्ब्ध, अस्मितारान्य अशा वंशजानी शक्य तितक्या लवकर आपल्या भूतकाळाकडे पहावे, या हेतूने ह्या व अशा स्वरूपाचे आपली काही ग्रंथ प्रकाशित करून अल्प असे समष्टिऋण फेडण्याचे धारिष्ट करीत आहोत. त्याला उदार आश्रयाची अपेक्षा आहे. — प्रकाशक.

## आशीर्वाद

आपले ' पूजाविधि व विज्ञान ' हे अभिनव स्वरूपाचे पुस्तक वाचले. त्यातील प्रत्येक सूक्ताचे स्वरूप व त्यामागील विज्ञानी दृष्टि, रुद्राचे अप्रतीम विज्ञानी वर्णन, दिवटिदीचे गूढ-प्रदोष पूजेचे महत्व हे विषय आणि पूजा-विधि–त्यातील मंत्र, विधान, व पूजासाहित्य या प्रत्येकामधील सखोल व व्यापक दृष्टीचे विज्ञान, ह्या गोष्टी वाचून आनंद वाटला व समाधानही झाले.

आजच्या सुधारणेच्या काळात भारतातील प्राचीन ऋषिमुनींच्या ज्ञानावर तुम्ही जो प्रकाश टाकून जरूर ते मार्गदर्शन केलेत व याच स्वरूपाची कर्मकाण्डीय पुस्तके काढू इच्छिता याबद्दल तुम्हास धन्यवाद व मंगल सुयश चिंतितो मंगलमय प्रभु तुम्हास दीर्घायुष्य देवो व वैदिकधर्मांवरील अशाच निरनिराळ्या विषयावर वाङ्मय प्रसिद्ध होऊन जनताजनार्दनास योग्य मार्गदर्शन होवो ही सदिच्छा. 'सर्वत्र सुखिन सन्तु, । सर्वे सन्तु निरामय सर्वे भद्राणि पश्यंतु । मा कश्चित् दुःख माप्नुयात् '

इन्दोर — नाना तराणेकर

१६–२–१९७२

श्री माननीय गो प्र भावे यांचे 'देवपूजा परिचय' हे देवपूजेवरील एक आगळेंच पुस्तक आहे आजवर प्रकाशित झालेल्या भिन्न भिन्न पुस्तकांत देवपूजेविषयी केवळ परपरागत क्रियात्मक माहितीच आढळेत पण श्री भावे गुरुजी यानी देवपूजेंतील प्रत्येक कृतीमागील हेतु समजावून सांगितला असून, पूजेंत म्हणावयाच्या मत्रामागील व विशेषत सूक्तामागील वैज्ञानिक दृष्टीकोनपण स्पष्ट केला आहे

सध्याच्या वैज्ञानिक प्रगतीचे जसे काहीं लाभ आहेत, तसेच काही तोटे पण आहेत भौतिक विज्ञानाच्या प्रगतीचा अनुभव किंवा त्यापासून उपलब्ध होणाऱ्या सुखसोयी कुठल्याही माणसास पैशानें विकत घेता येतात व त्यामुळेंच आता उपासनादि अध्यात्मिक गोष्टीची गरजच काय? त्यासाठी लागणाऱ्या समदादि गुणाची आवश्यकता काय? अशा प्रकारचे प्रश्न तरुण जिज्ञासू मडळीकडून विचारण्यात येतात खरें म्हणजे पौरोहित्य करणाऱ्या वर्गास या प्रश्नाची उत्तरें देता आली पाहिजेत पण तसे फारच थोडयाप्रसगी घडवें, व सामान्य जिज्ञासूच्या मनातील श्रद्धा-आदर विचलित होण्याची पाळी येते. परंतु ही अडचण 'देवपूजा-परिचय' या पुस्तकानें निवारण केली असून पुरोहिताची व जिज्ञासूची मोठीच सोय झाली आहे

सनातन वैदिकधर्मातील निरनिराळया सस्कारामागील व आचारामधील वैज्ञानिक भूमिका सुस्पष्ट करण्याचे व्रत वयोवृद्धावस्थेंतही अखड चालवणाऱ्या श्री भावे गुरुजीना उदड आयुरारोग्य वेदोनारायणानें द्यावे व तरुण पिढीला, त्याच्या ज्ञानगगेचा लाभ घेण्याची प्रेरणा द्यावी हीच त्याचे चरणी प्रार्थना

माघ शु ७ शके १८९३ रथसप्तमि — ब्रह्मचारी विश्वनाथजी.

२२-१-७२ — मठुराश्रम.

JAMNADAS THAKKAR
18 NANDANVAN
269 SION WEST
BOMBAY 400022

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४४ | १० | ह्या आम्हां | ह्यात आम्हा |
| ४८ | ६ | वाह्यर्थं | हा शब्दच नको |
| ४८ | ७ | मगलावाह्यर्थं | मगला वाप्त्यर्थं |
| ८९ | ४ | मडी | वेडी |
| १३६ | १४ टीप | विष्णुपति | विष्णुपत्नी |
| १४२ | ४ | नासाईधात् | नसारधात् |
| १५१ | ११ | श्री विष्णूच्या | श्री विष्णूची |

# देवपूजा परिचय

## प्रथम दल



### पूजा कां, कोठें व कशी करावी ?

देवता ही एक श्रेष्ठ शक्ति आहे सहवास व नित्य सानिध्य ह्यामुळें व्यवहारात जसा अनेक गोष्टी साध्य होतात, तशीच गोष्ट देवपूजेची आहे. इष्ट देवतेच्या नित्य सहवासाने व पूजनाने देवाविषयी आदर व आपलेपणा वाढतो, देव माझा व मी त्याचा असा प्रेमांकुर वाढतो, म्हणूनच देवपूजा करावयाची श्रेष्ठ शक्तीशी सहवास, हालचाल व व्यवहार करावयाचा असतो सुख, समाधान, समृद्धि, व शांति मिळण्यासाठीं देवपूजा हा एक प्रत्येकाने करावयाचा विधि ( कृति–कर्म ) आहे. त्यासाठी काही माहित्य हवे, तसे स्थान म्हणजे जागाही हवी

### देवघर

देवाची पूजा करण्याच्या ठिकाणाला ' देवघर म्हणतात येथें सध्या-वदनादि विधि व देवपूजा हें एकंदर कर्म करावयाचे असते देवघर विस्तृत

मोकळे म्हणजे इतर कोणतीच अडगळ नसलेले, चांगली हवा व उजड असलेले असावे ते व त्यातील साहित्य अगदी स्वच्छ असून तें असे ठेवलेले असावे की, देवघर पहाताच मनाला आनंद व्हावा व प्रसन्नता वाटावी त्यातील जमीन फरशीपेक्षा मातीची असणें अधिक चांगलें कारण मंत्रातील शब्दाचे स्पंदन–प्रतिवाहित्व सर्वात जास्त चांगले मातीत असत पण फरशीमध्यें प्रतिरोधकत्वच जास्त असते त्याच्या आजूबाजूलाही गडबड किंवा आरडाओरड होईल असे काही नसावे देवपूजेच्या वेळी तरी शांतता असावी देवघर म्हणजे दिव्य शक्ति उत्पन्न करण्याचें स्थान– ' पॉवरहाऊस आहे स्वत च्या घरात ते ईशान्य भागात असावे

## साहित्य

देवासाठी लाकडी देव्हारा ( चंदन किंवा शिसवीच्या लाकडाचा शोभिवंत आकाराचा देव्हारा ) वा चौरंग असावा पूजा करण्यासाठी बसावयास शक्य तर एकसंध फळीचा – चंदन वा आंबा, फणस यांच्या झाडाचा – झाड हा लाकडातील ' ब्राह्मण जातीचा भाग '– असावा त्यावर दर्भासन– ऊर्णासन ( लोकरीचे ) असावे दिवा म्हणजे समई किंवा टांगता विजेचा सौम्य प्रकाशी ( निळसर वा हिरवा ) दिवा असावा हें मुख्य स्थाई साहित्य नेहमी स्वच्छ ठेवावे देव ठवण्याचा चौरंग पूजकाच्या आसनापेक्षा उंच असावा ( सन्मान दर्शक ) पाट न घेता केवळ आसनही चालेल

## नित्य पूजेचीं उपकरणीं

ताम्याचा तांब्या ( कलश ), पळी, पंचपात्री, दोन ताम्हन ( एक देव स्नानासाठी व दुसरे उदक सोडण्यासाठी ), गंध, अक्षता म्हणजे न तुटलेले पण ओले केलेले तांदूळ, बुक्का, हळद, कुंकु, सिंदूर वा गुलाल, धापूर, उदबत्तीचे घर, नीरांजन वा पंचारतिक्य, फुलें, तुळस, दुर्वा, बेल, ( त्रिदळें ), नैवेद्याचे पदार्थ– फळ अथवा गूळ, साखर, दूध इ०, पंचामृत ( दूध, दही, तूप, मध, साखर ) देव पुसण्याचे वस्त्र इत्यादि देवाची उपकरणी रोजच्या रोज धासून पुसून स्वच्छ करून ठेवली असावी जेथे स्वच्छता ( अंतर्बाह्य ) तेथे देव

पूजकाने स्नान करून नित्य धूत असे स्वच्छ वस्त्र किंवा रेशमी वस्त्र ( हे पण जरूर तेव्हा धुवून स्वच्छ केलेले असावे ) नेसून मगच देवघरात जावे. सायकाळी देखील पूजकाने धौत वस्त्रांतर करून देवघरात जावे. देव पूजा करिताना उत्पन्न झालेली मन्त्रोद्गारजनित स्पंदने व त्याचे दाढर्य नित्य टिकून रहावे, यासाठीच वरील निर्बंधाची फार जरूरी असते

देवघर हे दिव्य शक्ति उत्पन्न करून ती सवान्दनक्षम स्थितीत ठेवण्याचे केंद्र असल्यामुळेच ते व त्यातील सर्व साहित्य नीटनीटके, नित्य शुद्ध म्हणजे शक्त्युत्पादनक्षम ठेवणे, यासाठी पूजकाने वरील सर्व निर्बंध पाळणे जरूर आहे. समष्टि उपासनेची मठ–मंदिरादि स्थानेही वरील निर्बंधाने राखिली गेली म्हणजेच ती शक्तिकेंद्रे होतात. देवदेवतांची ' जागृत स्थानं ' असे समजले जाते तेथें, विशिष्ठ शक्तीच्या तीव्र लहरी उत्पन्न होतात. अमुक ठिकाणी अमुक देवता अत्यंत ' जागृत ' आहे असे जे एकतो तेथे उपासकाच्या विशिष्ट उपासनेमुळे उत्पन्न झालेल्या दिव्य शक्तीचे, ते स्थान केंद्र बनलेले आहे, असे समजावे. एवढेच नव्हे तर यात्री किंवा उपासक ह्यामधील तत्सदृश संवेदनाला तेथें चालनाही प्रतीत होते. देवघर व देवस्थानातील ' गाभारा ' ( जेथें देवतेचे वास्तव्य असते तो अन्तर्भाग ) पूज्य, पवित्र व महत्वाचा समजला जातो त्यातील रहस्य वरील वस्तुस्थितीत असते. देवघर रहात्या घरात ईशान्येस असावे व देवाचे मुख पश्चिमेला असावे. पूजकाने पूर्वाभिमुख बसावे

## धार्मिक कर्मकांडाचे उद्दिष्ट

पूजकाची ( स्थानिक, देशीय व तत्कालीन ) परिस्थिति व्यक्ति व कौटुंबिक जन ह्यांचे आरोग्य व सुखसमृद्धि आणि पूजकातील जीवाचा विश्वचालक शिवाशी संबंध जोडून तो अनुभव घेणे ही ध्येये साधणे, ह्या दृष्टीने प्रत्येक धार्मिक कर्मकांडाची म्हणजे कृतींची मांडणी व योजना शास्त्रकारांनी केलेली आहे. ह्र बघ, ह्याचा अल्प खुलासा करून मग पुढे मंत्र–तंत्र वा साहित्य–उपचार इत्यादि कृतींचा व त्यामागील आधुनिक विज्ञानी दृष्टीचा उहापोह करण्याचा प्रयत्न करू

*

## देवपूजेमागील दृष्टि

( अ ) व्यवहारी दृष्टि:– जसे ( १ ) पूजासाहित्या सवधानें ' यथा मिलितोपचारद्रव्यैः पूजयामि ' असा विचारी स्वरूपाचे मत्रादेश सागून कृति करविणे, ह्यात पूजकाच्या परिस्थितीचा विचार केलेला असून ते विचार कोणत्याही काळातील परिस्थितीला योग्य व लागू पडणारे आहेत असे सहज ध्यानात येईल. ( २ ) 'अस्माक सकुटुबाना... द्विपदचतुष्पद सहिताना क्षेमआयुरारोग्यैश्वर्याभिवृद्धयर्थं ' हा संकल्पविधि किती व्यवहारू व व्यापक अभ्युदयदर्शी हेतूचा आहे ? अशा सकल्प–वाक्यात ससारी मनुष्याच्या स्वाभाविक, मानसिक वासना व्यक्त केल्या असल्याने त्यात व्यवहार, व्यापकता व अभ्युदय ह्याचा समावेश होतो. यामुळे कोणाही विचारी माणसाला सकल्प मत्र उच्चारिताना आनद तर वाटेलच; पण त्या बरोबरच ' संकल्प ' मत्रादेशाचे महत्वही ध्यानात येईल

( आ ) आरोग्य दृष्टि – ( १ ) स्थानशुद्धीसाठी 'गोमयासारख्या सर्व श्रेष्ठ कृमिघ्नाचा उपयोग, सडासंमार्जनासाठी पण त्याचाच उपयोग ( २ ) देहशुद्धीसाठी जलस्नान, व धौतवस्त्र परिधान ह्यासारखे बाह्यशुद्धीचे आदेश व उपाय ( ३ ) वर्षातील निरनिराळ्या नैमित्तिक प्रसगी 'पंचगव्य * ( गव्य म्हणजे गाईपासून मिळणारा पदार्थ व त्या दूध, दही, तूप, गोमूत्र व गोमय या पाच वस्तूचे मिश्रण ) प्राशनविधीचा आदेश व त्यापासून होणाऱ्या शारीरिक परिणामाचा दर्शक मंत्र ' यत्वगस्थिगतं पापं देहे तिष्ठति मामके । प्राशनात्पंचगव्यस्य दहत्यग्निरिवेन्धनम् ' ( ४ ) धूप ( विविध प्रकारचे गुग्गुलादि पदार्थयुक्त धूप ) जाळणे इत्यादि गोष्टी वैयक्तिक व स्थानिक आरोग्याला मचालक, पोषक व वर्धक असाच आहेत असे नाही का ?

* गाईच्या शेणाच्या लेपनामुळे ॲटमबॉंब, तत्सम स्फोट व त्याचे दुष्परिणाम कसे टळतात हे रशियन शास्त्रज्ञानी नुकतेच सिद्ध केले आहे, व पचगव्यावर त्याचे सशोधन सुरु आहे

( ई ) जीवशिवैक्य–साधक दृष्टिः– ह्या विषयाचा संबंध अंतरिंद्रियें व अतींद्रियविज्ञान ह्याशी आहे तो असा– त्या त्या देवतांचीं म्हणजे, वैश्विक शक्तीची केंद्रें, आणि पूजकाच्या शरीरातील मर्मे व चर्मे ह्यातील ग्रंथी ह्याचा मंत्रोच्चारजनित स्पंदनाचा संबंध जोडून तो संपर्क कायम ठेवण्यामुळें देवता आवाहन, स्थिरीभवनादि, मंत्रोच्चारित क्रिया जीवशिवाचा संबंध जोडितात

' पूज् ' या मूळ धातूचा अर्थ आदर करणे, सत्कार करणे, सेवा करणे, असा आहे ' दात न थे तब दूध दिया ' अशी सोय करून ज्यामुळें आपण जगलो व वाढलो, त्या शक्तीबद्दल, त्या परमेश्वराबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्याचें पूजा हें एक कार्य आहे. तें प्रत्येकानें करावयाचे असतें

देवपूजेचें स्वरूप व प्रकार– पूजकाची मानसिक चळवळ व करण्याची तयारी यावर पूजेचे स्वरूप अवलंबून असतें

× प्रकार – श्रीमद् भागवताचा एकादश स्कंद यात आठ व अग्निपुराण यात सहा पूजास्थानें ( विश्वाधार अशा चिच्छक्तीची स्थानें ) सांगितलेलीं आहेत त्यापैकी पुढें दिलेल्या कोणत्याही एका ठिकाणी परिस्थितीप्रमाणे पूजा करावी असे सांगितलेलें आहे भागवताप्रमाणे तीं पूजास्थानें अशीं– प्रतिमा, भूमि, अग्नि, सूर्य, उदक, ब्राह्मण व स्वगुरु; पण अग्निपुराणात पहिली सहा स्थानें मान्य केलीं आहे। या पूजास्थानात कोणी कोणत्या उपचारानें पूजन करावें हें पुढील कोष्टकावरून सहज ध्यानात येईल

---

× आर्चायां स्थंडिलेऽग्नौ वा सूर्ये वाऽप्सुहृदि द्विजे ।
द्रव्येण भक्तियुक्तोऽर्चेत्स्वगुरुमात्ममायया ॥

( १ ) किंवा अग्निपुराणात
' अप्स्वग्नौ हृदये सूर्ये स्थंडिले प्रतिमासु च ।
षट्स्वेतेषु हरेः सम्यगर्चनं मुनिभिः स्मृतम् ॥
अशी पूजा स्थानें सांगितलीं आहेत

देवता, उपचार व अधिकारी ( पूजक )

| | स्थान | उपचार | अधिकारी |
|---|---|---|---|
| १ ) | अग्नि | हविर्द्रव्यें, गधादिसर्व उपचार | कर्ममार्गी |
| २ ) | जलाशय (जसे नदी)– | फुले उदक समर्पण | सर्वसामान्य लोक |
| ३ ) | हृदय | मानसिक ध्यान | योगी |
| ४ ) | सूर्य | जप, अर्घ्य, उपस्थान | विचारी, बुद्धिवादी |
| ५ ) | भूमि– ( प्रोक्षणादि सस्कार केलेली जमीन ) | नमस्कार | केवळ भाविक, अल्पबुद्धिक. |
| ६ | मूर्ति | पुष्पादिसाहित्य व मत्र | सर्व उपासक, पूजक |

( २ ) पूजा पद्धतीची निराळी माडणी ( कल्याण उपासनाकाप्रमाणे )

| | | | परिणाम |
|---|---|---|---|
| १ ) | अभिगमनपूजा | देवतेची जागा स्वच्छ करणे, शुद्ध करणे निर्माल्य काढून ठेवणे इत्यादि | साष्टि मुक्तिप्रद |
| २ ) | उपादानपूजा | गध, फूल, इत्यादि सामग्रीचा सग्रह करणे | समीपता मुक्तिप्रद |
| ३ ) | योगपूजा | इष्ट देव हें आपलेच रूप आहे, स्वत-मध्येंच देवाला भावनेनें पहाणे | सरूपता मुक्तिप्रद |
| ४ ) | स्वाध्याय पूजा · | मत्रार्थावर लक्ष ठेवून जप करणें, स्तोत्रादिकाचा पाठ करणे, गुण, नाम, लीलादिकाचे कीर्तन करणे, वेदातादि शास्त्राचा अभ्यास करणे | सायुज्यता मुक्तिप्रद |
| ५ ) | इज्यापूजा · | अनेक उपचाराद्वारा आराध्य वा इष्ट देवतेची पूजा करणें | मुक्तिप्रद |

## द्वितीय दल

### पंचायतन पूजा परिचय

देव म्हणजे दिव्य शक्ति पाच प्रकारच्या साकार दिव्य शक्तींची एकत्र पूजा म्हणजे पंचायतनपूजा होय इष्ट ध्येय साधनाच्या दृष्टीनें

त्याची रचना म्हणजे पूजा त्याची मांडण्याची पद्धति पुढें देत आहे पण त्या पूर्वी त्याच्या प्रतिकांचा परिचय करुन घेऊं

## पांच देवता व त्यांची घरगुती प्रतीकें

गणपति, शिव, हरि, भास्कर व अम्बा ह्या त्या पाच देवता होत स्फुल्लींग हा जसा अग्नीचे केंद्रित शक्ति स्वरुप असते, किंवा बीज हें जसे वृक्षाचे केंद्रीवृत किंवा केंद्रीभूत सूक्ष्म स्वरुप असतें, त्याचप्रमाणे वरील देवदेवता प्रतीकरुपाने आहेत.

वरील पाच देवापैकी देवी ( अम्बा ) ह्या देवतेचीच कोठें धातुमय प्रतिमा ( कोठें सुवर्णमुखी देवी म्हणून स्वर्णमाणिकाचा खडा असतो ) असते, तर कोठें ललितापंचमीच्या पूजा निमित्तानें करंडकाचे झाकण ' देवी ' म्हणून असते इतर देव पुढें दिलेल्या स्वरुपात असतात जसे-- नर्मदा नदीतील लाल रंगाचा पाषाण म्हणजे ' गणपति ' यालाच सामान्यतः ' नर्मदा गणपति ' असे म्हणतात काही घराण्यात धातुमय गणपतीची लहान मूर्तीही असते. ज्याला ' बाण ' असे म्हणतात तो पण नर्मदेतील लहान पांढरा पाषाण तो शिव असतो गंडकी नदीतील काळ्या रंगाचा गोल किंवा लांबट असा पाषाण तो विष्णु ( त्याला ' शालिग्राम ' म्हणतात ) आणि चापट बैठकीचा गोलाकार ' स्फटिक मणि ' वा ' सूर्यकांत मणि ' तो सूर्य या स्वरुपात असतो अशा प्रकारची पंचदेव पूजा, पंचायतन पूजा--ही भारतातील सर्व संप्रदायाच्या संरक्षणाच्या, व्यक्तिविचार स्वातंत्र्याच्या, पण टिकाऊ समाजधारणेच्या दृष्टीने, आद्य शंकराचार्यांनीं जास्त जोरानें प्रचारित केली असे मानितात

**पांच देवता – पांच शक्तिः--** गणपति हा बुद्धिदाता आहे बुद्धि ( सद्‌बुद्धि, चतुरबुद्धि, सर्व श्रेष्ठ बुद्धि ) रुपी शक्ति प्राप्त होण्यासाठीं गणपतीची उपासना करावयाची असते शिव देवता परमोच्च ज्ञानाचे विश्वचैतन्य ज्ञानाचें, मूर्तस्वरूप आहे. सर्व प्रकारच्या परमोच्च वैभवाचें आगर विष्णु ही देवता आहे भास्कर म्हणजे सूर्य ही सर्वश्रेष्ठ अशा तेजाची तेजसामर्थ्याची, देवता आहे आणि अम्बा म्हणजे देवी ही अद्वितीय सामर्थ्याची, शत्रु म्हणजे विरोधी शक्तींचा नाश करणारी, देवता आहे. अशा ह्या पांचही प्रकारच्या शक्ति प्राप्त करुन घेणें हा पंचायतन पूजेचा हेतु आहे.

## एका वैदिक शक्तीचे पंचाविष्कार

१ श्री गणेश प्रमुख पंचायतन    २ श्री शिवप्रमुख पंचायतन



३ श्री विष्णु प्रमुख पचायतन    ४ श्री सूर्य प्रमुख पंचायतन



## ५ वी देवी प्रमुख पंचायतन



भारतीय धर्मसंस्कृतिधारणेप्रमाणे देवतापंचायतनाच्या मांडणीत मध्य भागीं मुख्य देवता असावी. चित्राची समोरची वरची बाजू ही प्रसिद्ध पूर्व, खालची बाजू पश्चिम, उजवीकडे दक्षिण व डावीकडे उत्तर असून त्या पद्धतीने उपदिशा समजाव्या. आधुनिक नकाशातील दिशापद्धति निराळी आहे.

कोंकणप्रांती गुहागर या गावीं शिवप्रमुख पंचायतन देवतामंदिर. तसेंच हर्णै या बंदर गावीं विष्णुप्रमुख पंचायतन मंदिर आहे. काशी येथील विश्वेश्वर मंदिर हें शिवप्रमुख पंचायतन स्थान आहे. अशीं निरनिराळी पंचायतन स्थानें भारतात अन्यत्र आहेत. तथापि सूर्यप्रमुख पंचायतन स्थानें मात्र तुरळकच आहेत. तीं सर्व हिंदु धर्मियांच्या समृद्धिधारणेसाठी उपासना स्थाने आहेत. भारतीय हिंदु धर्म यावच्चंद्रदिवाकरौ टिकून रहावा व तो तसा राहीलच. याचें सर्व श्रेय आद्य शंकराचार्यांनीं केलेल्या देवतापंचायतन पूजा प्रतिष्ठापना व प्रचारकार्य यानाच आहे. अवतारी व्यक्तीची प्रतिभा दृष्टि म्हणतात ती हीच.

स्वत चे व अखिल विश्वाचे चालना, धारणा, पोषण व नियमन करणारे असे जें सामर्थ्य त्याच्या या पाच शक्तिदेवता घटक आहेत इष्ट ध्येय प्राप्तीसाठी एक मुख्य मानून इतर देवता त्या देवतेशीं सहकार्य करणाऱ्या आहेत असे मानून, त्या विचाराने गणेश प्रमुख– विष्णु प्रमुख– शिव प्रमुख– देवी प्रमुख– आणि सूर्य प्रमुख– अशी पाच प्रकारची पचायतने व त्याची पूजा केली जाते यामुळें प्रत्येक पचायतनात मुख्येतर देवतेची– देवतारूप शक्तीची स्थानें निरनिराळी असतात 'स्वस्थानवर्जिता देवा दु खशोकभयप्रदा ' ( निश्चित स्थाने सोडून भलत्याच क्रमानं पूजिलेले देव दु खशोकभय देणारे होतात ) अशी स्मृतिवचनें पचदेवताच्या माडणीसाठी सुचविलेली आहेत म्हणून पचायतनात मुख्यदेवता मध्यें माडून इतर देवता कोठें माडाव्या याचे शास्त्र आहे त्याला अनुरूप अशी पंचायतनाची मांडणी येथें चित्ररूपाने केलेली आहे पचमहाभूतें व पाच देवता याचा परस्परानुबंधी सबध आहे व त विज्ञानी सत्य आहे

पंचमहाभूतें–पचोपासना व पचीकरण — आद्य शकराचार्यांचा 'पचीकरण' या नावाचा एक ग्रथ आहे. त्यात 'त्रिवृत्करण' नावाचा सनातन वैदिक धर्माचा अत्यत मौलिक असा वैज्ञानिक स्वरूपगर्भ असलेला न्याय आहे त्यात सगुण ब्रह्माची पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश ही एक एक गुणाचीं प्रतीके, अशी पाच रूपें सागितली असून ' पचदेवता ' ह्या, त्या त्या भूतामधील अंशरूप यौगिक चिच्छक्तीची अभिव्यक्ती आहे, असे सांगितले आहे त्याचा सबध असा —

| महाभूत | अभिव्यक्तीचे नाव ( देवता ) |
|---|---|
| पृथ्वी | शिव |
| आप जल | गणेश |
| तेज | सूर्यशक्ति |
| वायु ( मरुत् ) | महेश्वरी–देवी |
| व्योम | विष्णु |

व्यक्तीमधील चिदंश जो जीव, तो ज्या घरात असतो, ते घर म्हणजे देह, तो वरील पंचमहाभूतांचा बनलेला आहे. यामुळे उभयतांचा संबंध परस्परानुबंधी असलेला योग्य व सहज आहे असे विज्ञानविषयक सत्य आहे. यावरून भारतीय हिंदु समाजामधील शैव, शाक्त, वैष्णव, सौर व गाणपत्य हे उपासना केवळ सांप्रदायिक आहेत असे नसून पंचदेवोपासना ही प्रत्येक व्यक्तीच्या मानसिक ठेवणीला अनुरूप असलेल्या धारणेची द्योतक आहे, असे ठरते एवढेच नसून ती जगातील प्रत्येक मानवी व्यक्तीला योग्य व जरूर अशी सहज विचारधारा आहे, असे ठरते. यावरून पंचोपासना ही जागतिक विज्ञानाधिष्ठित अशी मनुष्यत्वदर्शक विचारधारा आहे, असे सिद्ध होते.

## रोगनिवारणार्थ पंचदेवोपासना

प्राणिमात्राचे शरीर पंचमहाभूतोद्भूत आहे. त्यापैकी मनुष्य हा एक प्राणी. पंचभूतोद्भूत रोगावर उपाय म्हणून पंचभूताधिष्ठात्री देव–देवतांचा उपयोग रोगनिवारणासाठी करू शकतो. त्यासाठी चरक, सुश्रुत, माधवनिदान इत्यादि आयुर्वेदीय ग्रंथामध्ये तत्तत्वोद्भूत रोगनिवारणासाठी तत्तत्वाधिष्ठात्री अशा देवतेची उपासना सुचविली आहे. जसे वायुतत्वोद्भूत रोगावर सूर्योपासना, जलतत्वोद्भूत रोगावर गणेशोपासना किंवा कुष्ठासारख्या रक्तदोषावर उपाय म्हणूनही सूर्योपासना ही सुचविलेली आहे. मयूर नावाच्या कवीने कुष्ठरोग निवारणासाठी 'सूर्यशतक' नावाचे उपासना-विधान सांगून तो रोग नष्ट * करून दाखविला (पंचदेवोपासना–उपासनांक

* कृष्ण भगवानाचा मुलगा साम्ब ह्याला कुष्ट रोग झाला. त्यासाठी गरुडाने कुष्ठरोग तज्ज्ञ वैद्य शाकद्वीपातून आणिले व सूर्योपासना करवून साम्बाला रोगमुक्त केला असे भविष्य–पुराणाच्या ब्रह्मपर्वात सांगितले आहे. ( २ ) वायुदोषोद्भूत रोगासाठी सूर्योपासनेचा ठराविक विधि या अतिसारा-सारख्या जलतत्वोद्भूत रोगावर उपाय म्हणून 'गणेश आराधना' सांगितली आहे ( माधवनिदान–अतिसार निरूपण )

## पूजा पद्धति व तिचें स्वरूप

देवपूजा सामान्यतः दोन प्रकारची असते (१) मानसपूजा व (२) सगुण मूर्तिपूजा. प्रस्तुत पुस्तिकेत मुख्यतः सगुणमूर्तिपूजा कोणत्या माहित्यानें कशी करावी ह्याची माहिती पुढें सविस्तर यायची असल्यानें त्यापूर्वी 'मानसपूजे' ची थोडक्यात माहिती देऊन मग सगुणमूर्तिपूजेकडे वळू.

(१) मानसपूजा परिचय – इष्ट देवतेची मूर्ति मनात आणून गंध पुष्पादि एकेक पदार्थ मनानेच त्या देवदेवतेला अर्पण करावयाचे असतात. म्हणजे या प्रकारच्या पूजेंत प्रत्यक्ष त्या त्या पदार्थांची जरूर नसते पण त्या त्या भौतिक वस्तूचे अक्षरात्मक प्रतीक वाणीने उच्चारून तो तो पदार्थ त्या मूर्तिला मनानेच अर्पण करावयाचा असतो यामुळें 'मन' हें एकच इंद्रिय (अवयव नव्हे) व वर्णोच्चारापुरता 'वाणी' हा अवयव ह्या दोहोंचाच संबंध या प्रकारच्या पूजेंत येतो. ती मानसपूजा पद्धति अशी – देवतेच्या नावाचा 'ॐ श्री महालक्ष्म्यै नमः' किंवा ॐ श्री गणपतये नमः' असा चतुर्थ्यंत–उच्चार करून मग 'ॐ लं' पृथिव्यात्मकान् गंधान् कल्पयामि, (गंधमुद्रेनें) 'ॐ हं' आकाशात्मक पुष्प–पुष्पाणि–कल्पयामि, (धूपमुद्रेनें) 'ॐ यं' वायव्यात्मक धूप कल्पयामि, 'ॐ रं' अग्न्यात्मक दीप कल्पयामि (दीपमुद्रेनें), (नैवेद्य मुद्रेने) 'ॐ वं' अमृतात्मक नैवेद्य कल्पयामि एवढ्याच पाच उपचारांची मानसपूजा केली जाते 'कल्पयामि' या शब्दाऐवजी 'समर्पयामि' हा शब्दही म्हणतात ही धर्ममार्गीय मानसपूजा होय मंत्रपूजा मुद्रांची कृति व आकृति या पुस्तिकेत पुढें दिलेल्या आहेत. एकटया 'नैवेद्य' मुद्रेने सदरहू मानसपूजा केली तरीही चालत, असे मुद्राशास्त्र मानते पण सामान्य वृत्तीच्या मनुष्याला देवतारूप चिदंशाशीं सहज तल्लीन होण्याला ही मानसपूजा कठीण किंवा अशक्यही आहे म्हणून सर्व प्रकारच्या प्रत्यक्ष वस्तु घेऊन मग त्या त्या वस्तु वा उपचार घेऊन मूर्तिपूजा करणे अस्त सुलभ व सोपें जाते, म्हणून त्याचा विचार करू या

[२] (अ) वैयक्तिक सगुण पूजा – सगुण मूर्तिपूजा ही सामान्य स्त्रियांच्या व धारणेच्या मानवाला सुगम, सुलभ व सुसाध्य आहे कारण ह्या पूजेमध्यें

मूर्ति हा एक पदार्थ पूजकासमोर असतो मानसपूजेप्रमाणे केवळ कल्पनागम्य व कल्पनारूप नसतो. या प्रकारात ते प्रतिक जणु आपल्यासारखा मानवच आहे असे समजून स्नान, खान, पान, आभूषण धारण, भोजन–तांबूल सेवन, शयनापर्यन्तचे सर्व विधि योग्य तऱ्हेने नित्यनियमाने यथाभाग करावयाचे असतात याचे नाव सगुण पूजा

या विधीतील प्रत्येक क्रिया ठराविक मंत्र म्हणत, ठराविक साहित्याच्या मदतीने करावयाची असते अशी क्रिया करिताना पूजकाची कर्मेंद्रियें व त्या बरोबर मन ही या प्रतीकाशी आपलेपणाच्या प्रेमळ भावनेने गुंतलेली असतात अशा नित्याच्या क्रियेमुळें पूजक, त्या प्रतीकातील शक्तीशी पूर्ण जिव्हाळयाने समरस होऊन जातो आणि मग ती शक्ति पूजकाचे त्याच्या हेतुप्रमाणे म्हणजे संकल्पाप्रमाणे, कार्य करू शकते उपासकाच्या आतरिक भावनादाढर्याच्या क्षमतेप्रमाणे काही कालावधीने पूजक स्वत मधील आत्मशक्ति व प्रतीकामार्फत उत्पन्न झालेली वैश्विक शक्ति याचा मिलाफ, मीलन किंवा ऐक्य अनुभवू शकतो याचेच नाव आत्मसाक्षात्कारी सगुण पूजा व तिचे फल वा परिणति होय अशा वैयक्तिक सगुण पूजा विधानात सुवासिक पुष्पें, सुगंधी धूप, वा उदबत्ती, घंटा सनई इत्यादिकाचा मजूळ नाद ह्या गोष्टी पूजकाच्या दैवी शक्तीशी एकतानता व्हावी ह्यासाठीच मागितलेल्या आहेत

( आ ) भारतीय समष्टि–दृष्टीची सगुणपूजा — भारतीय मठ–मंदिरातील देवतेच्या प्रतीकरूप मूर्तींची सगुणपूजा–वैयक्तिक प्रतीक पूजेप्रमाणेच, सर्व साहित्याने करावयाची असते जरी त्या देवतेचा ठराविक पूजक नियमितपणे पूजा करीत असतो, तरीही त्या त्या देवतेचे उपासक मठ–मंदिरात येऊन पूजा सुरू असताना समूहाने व सोईनें त्या कृत्यात सामील होतात व पूजा संपन्न घरोघ ी जातात

मठ–मंदिरातील सगुण पूजेतील काही विधि वैयक्तिक गृहातील पूजेपेक्षा थोडे निराळे वा जास्तही असतात जसे काकड आरती–भूपाळी यासारखे

मूर्तिरूप प्रतीकातील शक्तीला चालित वा जागृत म्हणजे कार्यक्षम करण्याचे विधि, तसेच रात्री गेजारतीचे विधि, हे विधि, बहुधा सामुदायिक रीतीने केले जातात त्या विधीतही उपासक व्यक्ति आपापल्या मानसिक तयारी-प्रमाणे तल्लीन होत असतात, आणि व्यक्तिव्यक्ती मिळून उत्पन्न झालेल्या शक्ति, मठमंदिरस्थित प्रतीक मूर्तीतील शक्तीशी मिळालेली असते यामुळेच मठ-मंदिरांना समष्टित्व म्हणजे सामुदायिक-सामाजिक असें महत्व प्राप्त झालेलें असते. व्यक्तिगत उत्पन्न झालेल्या शक्तीचीं अनेक स्पंदने मठ-मंदिरस्थित मूर्तीत शिरून उत्कालित होऊन, त्या मंदिरात एक सारखीं वहात असल्याचा परिणाम म्हणजेच त्याच देवतेची 'जागृतस्थिति' होय याचेच नाव 'जागृत देवस्थान.' वैयक्तिक देवघरातही तशीच स्थिति अनुभविता येते, पण केव्हा ? व्यक्तिगत उपासना दाढर्यामुळेच तशी स्पंदने उत्पन्न होतात व त्या पंचायतन प्रमुख देवतेमध्ये तेजरूपाने किंवा अन्य प्रकाराती दिसतात, आणि अनुभविता येतात

( ६ ) हिंदितर समष्टि सगुणपूजा :- इस्लामी, ख्रिस्ति, याहुदी या धर्मीयामध्यें सामुदायिक ( समष्टि ) पूजोपासनेवरच जास्त जोर दिला जातो, असें स्थूल विधान करिता येत ते एकेश्वरवादी म्हणजे ते सागतील तोच एक देव व इतर देवशक्ति नाहीत, अशा वृत्तीचे ते असल्याने, ख्रिस्ति किंवा याहुदी यांच्या समष्टि-सगुणपूजेमध्यें थोडी सामुदायिक गभीरता भासते कारण देवतेचे प्रतीक समोर असतें, पण इस्लामीयात मुख्यत शुष्क कवाइतच भासत कारण त्यात प्रतीक नसल्याने पचभौतिक इंद्रियाना गम्य असे काहीच नसतें केवळ निर्गुण निराकार असे जें ते मानितात व जें केवळ अतींद्रिय ज्ञानगम्यच असत, असे सामान्य मानवी धारणेला अनाकलनीय असे काहीतरी भाषावर्णोच्चारित असं काहीतरी, मुख्यत श्रवणेंद्रिय गम्य, एवढेच काही तरी, असात 'एवढेंच खरे' या अव्यावहारिक विचारसरणीमुळे इस्लामियाना समष्टि-मन पूजनाच्या नादब्रह्माचे म्हणजे वाद्यवादनाचे नितात वावडें आहे, असे भासविल जातें या उलट हिंदु, बौद्ध किंवा जैन समष्टि-पूजेमध्यें नादब्रह्माची जोड दिल्याने सर्व इंद्रियामध्ये सामष्टिना व

समतोल, उत्पन्न होऊन व्यष्टि समष्टि दोन्हीही स्थिति एकतानतेच्या आनंदात तल्लीन झालेल्या असल्याचे दिसतें. एवढेंच नव्हे, तर अनुभविता येतें तशी नादब्रम्हाची जोड ख्रिस्ती वा याहुदी धर्मीय पूजेंत नाही. पण मक्केमधील ' काबा ' हें स्तम्भरूप पवित्रतम प्रतीक असे मानिले जातें. त्याचे दर्शन, स्पर्शन, आलिंगन व चुंबन, पुष्पधूपसमर्पण हे व्यवहार करून मग 'काबा' सभोवार सात सोमसूत्री प्रदक्षिणाही घालून ते उपासना * सफलवितात

*सारांश, व्यष्टि किंवा समष्टि :– वैय्यक्तिक किंवा सामुदायिक* देवतापूजन हा अनेक उपचारयुक्त पूजाविधि भारतीय हिंदु पूजा पद्धति इतका सर्वांगीण रोचक व वेधक ख्रिस्ती, याहुदी, इस्लामी किंवा चिनी जपानी बौद्ध धर्मीयात नाही. त्याचे एक कारण त्यांची त्यांची सृष्टिसंबंधीची भौगोलिक परिस्थिति हे आहे पण थाईलॅण्ड, कॉम्बोज, जावा, बाली या देशातील बौद्धधर्मीय पूजाविधि व उपचार अन्य स्थानीय बौद्धधर्मीयांपेक्षा जास्त सोपस्कारयुक्त असतो तथापि इतर कोणत्याही धार्मिक मूर्तिपूजेंत म्हणजे देवपूजेंत भारतीय हिंदू पूजापद्धती इतकी ' एकांत अनेकत्व व अनेकात एकत्व ' पाहण्याची व अनुभवण्याची दृष्टी , नाही हें सत्य आहे

देवतापूजेचे इतर प्रकार – भागवत व अग्निपुराण यामध्यें देवपूजेची जी निरनिराळी स्थाने सांगितलेली आहेत, ती सर्व सगुणदेवतेचीच स्वरूप-स्थाने आहेत यामुळें त्या त्या ठिकाणी पूजन केल्यानेही इष्टफल मिळू शकते प्रत्यक्ष मूर्ति समोर ठेवून अडचणीच्या परिस्थितीमुळें, उपचार समर्पण करणे शक्य नसेल तरच त्या त्या ठिकाणी सुचविलेल्या पद्धतीप्रमाणे, पूजा केली, तरी इष्टफल प्राप्त होते

## तृतीय दल

### पूजाविधीमधील कांहीं विज्ञान रहस्यें

' मनुष्यगंधनिवर्हणम् विधि– षोडपोपचार पूजाविधीमध्ये संकल्पानंतर आसन विधि व मनुष्यगंधनिवर्हण विधि हे शास्त्राने सांगितलेले आहेत

* सचित्र आठवडी टाईम्स आफ इंडिया– ७ फेब्रु १९७१ व ' नॅशनल जिऑग्रफिक ' या अमेरिकन मासिकात ( जाने १९६६ व नंतर यात ) सचित्र वर्णन आहे

ते वैकल्पिक म्हणजे पूजा करणाऱ्याच्या इच्छेवर सोपविलेले आहेत पण ते करणे चांगले ते का याचा खुलासा असा आहे सध्या–विधीमध्ये ' भूतोत्सारण विधि ' व त्याचे मंत्र सांगितले आहेत ते त्या त्या ठिकाणी सूक्ष्मरूप भूतादिकांची व प्राण्यांची आपल्याला पीडा न व्हावी यासाठी सांगितले आहेत तसेच मंत्र व विधि आसनसिद्धीसाठी करावयाचे असतात ' मनुष्यगंधानिबर्हणविधि ' याचा अर्थ मानवी शरीराच्या अवयवामार्फत देवताच्या शरीराला ( मूर्ति या प्रतिमांतर्गत शक्तीला ) स्पर्श करिताना, त्याना त्रास न व्हावा म्हणण्यापेक्षा, त्याच्या सूक्ष्म शरीरावर अनिष्ट परिणाम न व्हावा, व आपणही शुद्ध व्हावे, म्हणून ( निबर्हण–न होऊ देणे– नाहिसा करणे इत्यादि ) म्हणावयाचे मंत्र ( जसे– येभ्योमाता...पर्यंन्त ) म्हणावयाचे असतात या विधीतील हेतु व तत्साधक मंत्र ह्यात फार मोठे व श्रेष्ठ असे विज्ञान भरलेले आहे कसे ते पहा—

मानवी शरीरापेक्षा त्या त्या देवदेवताची शरीरे अत्यंत सूक्ष्म व दिव्य परमाणूंची–मंत्रोद्‌भूत शक्तीतील सूक्ष्मतम परमाणूंची–बनलेली असतात यामुळें आम्हालाही आमच्या शरीरातील परमाणू तत्स्पर्शयोग्यतेचे बनवित रहाणे वा बनवणे, तितके सूक्ष्मतम–संवेदनक्षम म्हणजे कमी दोषयुक्त करविणेच, योग्य असते स्नानाने आपले शरीर नुसते बाह्यत स्वच्छ होते. पण मंत्रोक्तस्नानाने तें शरीर पवित्र होते आणि अशा रीतीने पवित्र केलेले आपले शरीर, पुरुषसूक्तादि मंत्र व न्यासानी देवतारूप– ( त्या त्या इंद्रियामधील ग्रंथीरूप शक्तिकेंद्राना जागृत करून देवतारूप बनवणे ) करावयाचे एवढे कार्य झाल्यानंतर देवपूजेचा अधिकार देतो देवदेवताना तशा आपल्या अशुद्ध अपवित्र शरीरपरमाणूचा स्पर्श किंवा वासही सहन होत नाही, उदाहरणार्थ, विडीच्या धुराचा वास, कांद्याचा वास, मद्याचा वास सहन न होणारी माणसे * आपण पहातो याचा अर्थ तो तो पदार्थ

* १ गौरांगप्रभूंची भावसमाधि न लागणे रामकृष्ण परमहंसाना जखम असलेल्या नरेनचा ( म्हणजे विवेकानंदाच्या जखम असलेल्या शरीराचा )

सहन न होणाऱ्या माणसाची ती ती इंद्रियें ( अवयव नव्हेत ) तितकी नाजूक, त्वरित सूक्ष्म परिणामी, सूक्ष्म संवेदनक्षम ( म्हणजे अशक्त किंवा निर्बल नव्हेत ) झालेली असतात, हेच खरे हे शास्त्रीय सत्य, विज्ञानशास्त्रीय सत्य, आधुनिक भौतिक विज्ञानशास्त्रही कबूल करिते फार काय ? सूक्ष्मतम संवेदनक्षम यंत्रें ( म्हणजे भौतिकी वस्तूंचे पदार्थ ) तयार करून सूक्ष्मतम कार्यें त्या त्या यंत्रामार्फत ते शास्त्रज्ञ करून घेतात भारतीय कर्मकांडीय विधी-मध्यें असेंच दूरदृष्टीचें व श्रेष्ठतीचें विज्ञान भरलेलें आहे. फार काय, आमचें सोवळें ओवळें किंवा स्पर्शास्पर्श हीं थोतांडें किंवा धर्मावरील कलंक नसून आमच्या वैदिक धर्माच्या उच्चतम विज्ञानाची इतरत्र न आढळणारीं अशीं वैशिष्ट्यें आहेत, हें लक्ष्यात घ्यावें. एवढेंच नव्हे तर ह्याचा त्वरित विचार करून तदनुरूप आचरण करणारे कृतिवीर ( केवळ वाचावीर नव्हे ) बनण्याची नितान्त जरूरी आहे

## न्यास व मुद्राविधि

चंद्रावरून परत आलेल्या अमेरिकन व रशियन माणसाना तें खाली पृथ्वीवर परतल्यावर काही दिवस इतराचा स्पर्शही होणार नाही अशा स्थितीत ठेविले ह्यातही अनेक स्पर्शास्पर्श विज्ञान भरलेले आहे हा केवळ शरीरावरील बाह्य भौतिक परिस्थितीच्या परिणामाचा विचार झाला पण आमच्या कर्मकांडांत शरीराच्या अंत:शुद्धीसाठीं शक्ति केंद्रें जागृत करून शरीरांतील इंद्रियें शुद्ध म्हणजे संस्कार ( स्पंदनें ) ग्रहणक्षम व्हावीं म्हणून न्यासादि विधि आहेत

---

स्पर्श होतांच आग होणें, एक मद्यपानयुक्त व्यक्ति समोर येताच त्याच्या वासानें स्वामी रामतीर्थांना त्रास होणें, घाणेरड्या रोगानें पीडिलेल्या एका बाईनें गर्दीत घुसून येशूख्रिस्ताला केवळ स्पर्श केल्यानें येशूला बसलेला शक्ति-पाती धक्का ( ल्यूक या भक्ताच्या येथें ख्रिस्ताच्या शुभवर्तमानात ८४६ या स्तभांत वर्णन आहे ) या गोष्टी वगैरे विज्ञान सिद्धिल्याच नाही ना सिद्ध करित ?

भारतीय शरीरविज्ञानशास्त्राप्रमाणे कर्मेंद्रियें व त्याचा प्रत्येक भाग, ज्ञानेंद्रियें व त्याचा प्रत्येक भाग, हे स्थूल, सूक्ष्म, सूक्ष्मतम आणि अतिसूक्ष्मतम रक्तवाहिन्यांच्या द्वारा– अनेक सूक्ष्मतम ग्रंथींशी × जोडिलेले आहेत त्यासाच निरनिराळे प्रकार आहेत ते हाताच्या बोटाच्या विशिष्ट भागाच्या स्पर्शानेंचे करावयाचे असतात प्रत्येक बोटाच्या अग्रस्थानी ठराविक देवता म्हणजे शक्तिधारक ग्रंथी असून त्या अग्रस्थ ग्रंथीचा स्पर्श, देहातील निरनिराळ्या ठिकाणच्या शक्तिशाली व शक्तिधारक ग्रंथींशी ※ लावून अपेक्षित शुद्धि, वा चेतना उत्पन्न करावयाची आणि इंद्रियें व अवयव चित्संवेदनक्षम बनण्याची पूर्वतयारी करणें ह्या गोष्टी न्यास क्रियेनें करावयाच्या असतात हे न्यास विधीचे मुख्य कार्य आहे

' कराग्रे वसते लक्ष्मी.. करमध्येतु ' इत्यादि श्लोक, हे वरील उद्दिष्ट प्राप्तीसाठीच असतात देवतीर्थ, ऋषितीर्थ वा पितृतीर्थ ह्या उजव्या हाताच्या व अंगुल्यांच्या प्रक्रिया, अंगुलीच्या पेरावरील जपपद्धति, हस्तसामुद्रिक शास्त्रप्रमाणे तळहात व हाताची पेरें आणि त्या त्या ठिकाणचे ग्रहाधिपति याना गंध कुंकुमार्पणासाठी ठराविक अंगुलीचाच उपयोग करणे, आहुती देण्यासाठीं ठराविकच अंगुलिक्रम उपयोगिणें, इत्यादि सर्व कर्मकाण्डीय कृत्यामध्यें पंचभौतिक शक्ति, वैश्विक शक्ति आणि त्याचा, शरीरस्थ मेंदु, पंचप्राण व जीवांतील चिदंश ह्यांशीं संपर्क साधून देणाऱ्या अनेक गूढ विज्ञानी रहस्यांचें सांकेतिक स्पष्टीकरण सांगितलेलें आहे. व ते फक्त कर्मानुष्ठान करणाऱ्यानाच ( केवळ वाचिवीराना नव्हे ) अनुभविता येते

× जसे– अग्निग्रंथी, ब्रह्मग्रंथी, विष्णुग्रंथी, रुद्रग्रंथी व त्याचे नियंत्रक गणपति, ब्रह्मदेव, विष्णु व शिव

※ जास्त माहितीसाठीं 'प्राचीन ब्रह्माण्डज्ञान व आधुनिक नवविज्ञान' –प्रो प्र भावे १९७० –नवज्योती प्रकाशन–दादर–मुंबई २८

मुद्रा – मुद्रा हें प्रत्येक प्राणिमात्राचे एक सह-ज, स्वभाव-ज असे कार्य आहे. मनुष्येतर प्राणी आपापले विकार कर्मेंद्रियांच्या मदतीनें म्हणजे हालचालीने व्यक्त करीत असतात, पण मनुष्यप्राणी आपले विकार व विचार, आपली हस्त-पादादि कर्मेंद्रियें, चक्षुरित्यादि ज्ञानेंद्रियें, त्यांच्या हालचालीने व आविर्भावाने व्यक्त करीत असतो अशा कृतींत मनुष्याचीं बहिरिंद्रियें व अंतरिंद्रियें आणि काही वेळा जाणत वा अजाणत अतींद्रियें, ही सर्व जरूर ते कार्य करीत असतात मनकवडेपणा परचित्तज्ञान, दूरदर्शन, दूरश्रवण इत्यादि चमत्कार म्हणून वाटणाऱ्या गोष्टी मुद्राविषयाशी निगडित आहेत 'मुद्रा' 'मुद–आनंद–ददाति' तसेच 'असुरान्' द्रावयति 'कुविचारान् नाशयति' 'मुद ददाति देवान्द्रावयत्यसुरानपि' हा मुद्रा शब्दाचा अर्थ आहे मुद्रा करिताना बोटें, बाहु, शिरा–रक्तवाहिन्या, स्नायु, ज्ञानतंतु यांवर दाब पडतो त्याचा परिणाम पाठीच्या कण्यामधून मेंदूकडे जाणाऱ्या मुख्य नाड्यांवर व तद्वारे मनाचे कार्य करणाऱ्या मेंदूवर होतो हा मदु मध्यमेंदूच्या मागच्या मानेकडील बोक्याच्या भागात आहे मुद्रांचा संबंध शरिरातील मेंदू व सूक्ष्मतम ज्ञानतंतु ह्यांच्याशीं येतो * मंत्र म्हणत मुद्रा करिताना त्या त्या स्थानातील देवतारूपी शक्तिकेंद्रें जागृत होऊन शरीरावर व अंतरिंद्रियांवर उत्कृष्ट परिणाम होतो म्हणून मुद्रांचे पूजा विधानात व इतर कर्मकांडीय कृतींत फार महत्व आहे प्रस्तुत पुस्तिकेत फक्त पूजा विधानांतील मुद्रांचाच विस्तार व विचार करावयाचा आहे त्या मुद्रा म्हणजे 'सुरभिज्ञानशूर्प–योनि' इत्यादि आहेत. देवपूजामुद्रा ( आकृति पहा ) त्या प्रत्यक्ष करा व कोणत्या अवयवावर व इंद्रियावर ताण पडतो ते सूक्ष्मपणे अनुभवा

| मुद्रा | निरीक्षण व रचना | कृति व विज्ञान |
| --- | --- | --- |
| (१) मृगी मुद्रा— | मृग म्हणजे हरीण त्याचे लांबट चिंचोळे तोंड व उभी दोन शिंगें देवाला नैवेद्य दाखवितांना ही मुद्रा करतात अगदी लहान मुलाला अन्न भरवितांना अशाच कृतीने आई अन्न थोडे थोडे बोटांनी भरविते (III) यज्ञांत हवनाहुती घेण्याचे मापही याच मुद्रेवर बसविले आहे | कृति— अंगुली व तर्जनी ही दोन बोटे सरळ उभी करून अनामिका व मध्यमा एकत्र जोडून त्याच्या मुळाशी अंगुष्ठाचे टोक जोडावे म्हणजे मृगी मुद्रा होते.<br>विज्ञान— त्या रचनेमुळें बोटे व तत्संबंधी शरीरावयव व इंद्रियें त्याशी जडित असलेल्या ग्रंथीवरील दाब या ताण आणि तद्द्वारे मेंदुभागाशी साधिलेला व होणारा चैतन्य जागृती-कारक संपर्क ही गोष्ट साध्य होते |
| (२) नैवेद्यमुद्रा— | अनामिकेच्या मध्य पर्वाला अंगुष्ठा-ग्राने स्पर्श करणे | |
| (३) योनी मुद्रा— | या मुद्रेतील बोटाच्या रचनेचा आकार स्थूलमानाने योनीसारखा होतो | विज्ञान— या मुद्रेमुळे नाभिस्थित ग्रंथीशी संबंध येतो |

| मुद्रा | निरीक्षण व रचना | कृति व विज्ञान |
| --- | --- | --- |
| ( ४ ) सुरभि मुद्रा— | पाचही बोटाची विशेषरचना चित्रांत पहा | विज्ञान— या मुद्रेचा पचन शक्ति नीट ठेवण्याशी संबंध आहे शरीरांतील पृथ्वी व जलतत्त्व किंवा वायु व आकाशतत्त्व याचे मीलन साध्य होते या मुद्रेच्या मदतीने पित्त-विकार शमतात मूत्रविकार नष्ट होतात म्हणून षट्चक्र भेदनक्रियेला ही मुद्रा सहाय्यक होते परंतु अव्य-वस्थित क्रियेने मृत्यूचा धोकाही संभवनीय असतो |
| ( ५ ) वेणु मुद्रा— | कृष्ण 'वेणु' नावाची स्वर-नलिका (अलगुजें, बासरी) वाजवीत असतांना तो एक पाय वक्र व दुसरा पाय सरळ ठेवितो ह्या निरीक्षणाच्या आधारावरील मुद्रा | कृति— 'अगवक्रअधरी धरि पावा' ह्या प्रकारची पाय, हात, बोटें व शरीर ह्याच्या रचनेने सुषुम्ना नाडी स्थिरावयाची तयारी होते व तद्द्वारे कुंडलिनी जागृतीची पूर्व तयारी होते. हें योग विज्ञान या मुद्रेत आहे |

प्रत्येक देवतेच्या पूजनात तिच्या आवाहनादि उपचार समर्पण प्रसंगी अशा भिन्न भिन्न मुद्रा आहेत त्याचा येथें विचार केलेला नाही

सगुण पूजाविधि हा आपल्या भारतीय पूर्वजानीं परंपरागत करून ठेविला आहे. त्याचबरोबर, ठराविक दिवशी कुलदेवता पूजन, कुलधर्म व कुलाचार पालन करणें आणि अशा रीतिनें समाजधारणा टिकली व जोपासिली जावी अशी योजना पूजाविधीच्या रूपानें केलेली आहे. भारतीय संस्कृतीमधील चिवटपणा व जिवंतपणा अशा कृतीनें टिकविला गेला व टिकविला जात आहे. हें अंधानुकरण या योगाने नाहीं.

पूजोपचार प्रकार व समर्पण पद्धति — देवदेवताना ( प्रतीकाला ) उपचार समर्पण करण्याचे मुख्य सहा प्रकार आहेत— ते असे १०८, ६४, १८, १६, १० व ५ उपचार घेऊन ते समर्पण करणे म्हणजे त्या देवदेवतेची यथासांग पूजा झाली असे शास्त्र आहे यापैकी १०८ व ६४ हे उपचार देवांच्या तांत्रिक ( म्हणजे तत्रशास्त्राच्या पद्धतीने केलेली पूजा ) पूजेंतच असतात सामान्यतः षोडशोपचार ( १६ ) पूजा वा पचोपचार ( ५ ) पूजा सर्व लोकानी स्वीकारलेली आढळते कोठें दशोपचार ( १० ) पूजाही करितात अनेक उपचार घेऊन पूजा करणें अशक्य असल्यास केवळ गध लावून फूल अर्पण करून पूजा केली तरीही चालते इतका दूर दृष्टिचा व्यवहारच भारतीय शास्त्रकारानी दाखविलेला आहे पण ही सवलत अडचण असेल तेव्हा पुरतीच आहे

देवपूजेंतील षोडशोपचार— ❀ १)पाद्य २) अर्घ्य ३) आसन ४) आचमन ५) स्नान ६) वस्त्र ७) गध ( अक्षता, हळदकुकु, शेंदूर ) ८) पुष्पादि ९) धूप १०) दीप ११) नैवेद्य–फल इत्यादि १२) तांबूल १३) दक्षिणा १४) प्रदक्षिणा १५) नमस्कार–मत्रपुष्प–आरती १६) प्रार्थना हे षोडषोपचार.

---

❀ आश्वलायन परिशिष्ट, आचारेंदु इत्यादि ग्रंथात पूजोपचाराची सविस्तर माहिती दिलेली आहे

देवपूजेतील दशोपचार– १) पाद्य २) अर्घ्य ३) आचमन ४) मधुपर्क ( दही, तूप, मध व थोडें पाणी हा उपचार नित्याचा नाही ) ५) आसन ६) गंध ७) पुष्प ८) धूप ९) दीप १०) नैवेद्य

पंचोपचार– दशोपचारामधील शेवटचे पाच ह्या पद्धतीची पूजा केवळ अडचणीच्या वेळींच गंधफूल वाहूनच करावयाच्या पद्धतीची आहे. पण अडचणीची किंवा वेळेची सबब सांगून नित्य तशी पूजा केल्यास स्वत चे धार्मिक वा अधार्मिक उत्कर्षाचे किंवा प्रगतीचे नुकसानच होते तसेच एखादा उपचार अथवा उपचार पदार्थ उपलब्ध नसेल तर केवळ त्या उपचाराचे केवळ स्मरण करून तुलसीपत्र किंवा अक्षता वहाव्या असेही सांगितले आहे

पूजेतील मुख्य विधि व त्यांतील रहस्यें– दशोपचार वा षोडशोपचार हे मागें सांगितल्याप्रमाणे सगुणोपासनेतील विधि आहेत त्यामध्यें पाद्य, अर्घ्य, आचमनीय, स्नानीय ह्या उपचार अर्पण विधीत पाणी हा मुख्य पदार्थ असून उपयोगाप्रमाणे इतर काही पदार्थ त्यात घालावयाचे असतात. सगुणोपासनेच्या कृतीत म्हणजे विधींत प्रतीकामधील ईश्वरांश जाणून त्याला आपल्या उद्दिष्ट कार्यसिद्धीसाठी बोलावून स्वागतापासून प्रार्थनापर्यंतचे सर्व कार्यक्रम नीट ठरवून घ्यावयाचे असतात यासाठीच या, बसा, स्थिर व्हा, शांत व्हा व उपासकाची विनती ऐकून तो सादर करीत असलेली सेवा घ्या आणि त्याची विनती मान्य करा. ह्या सर्व कार्यासाठी पुढील कृति म्हणजे विधि करावयाचे असतात अशा या विधीमध्यें कांहीं मर्यादा वा बंधने घातलेली आहेत म्हणून त्याचा थोडक्यात विचार करू.

देवता आवाहन पद्धतिः– आवाहन म्हणजे बोलाविणे हें काम ज्ञानेंद्रिया-कडून करावयाचे असते ते असे इष्ट देवतेची मूर्ति मनात आणून, डोळे मिटून, फुलें, तुलसी इत्यादि घेऊन समोरच्या प्रतीकरूप मूर्तींत ती देवता आली अशी भावना करून उपचार त्या समोरच्या देवतेवर वहाणे

( १ ) आवाहन मंत्रः– 'आवाहनार्थे पुष्पाणि वा अक्षतान् समर्पयामि' फुले निदान ४–५ असावी.

( २ ) आसन – 'आसनार्थे तुलसीपत्रम् समर्पयामि' ( देवतेला प्रिय असेल ते पत्र )

( ३ ) पाद्यम् – पाद धुण्यासाठी शुद्ध साधे पाणी, निदान चार पळया हे पाणी हाताने किंवा पळीने मूर्तीच्या पायावर घालावयाचे अथवा पुष्पानें मार्जन करावयाचे असतें पायापासून प्रारंभ करण्यात पूजकाचा नम्र भाव दिसतो उपासकाच्या आसनापेक्षा देवतेचे आसन उच्च ( उंच ) असावे ह्यातही हाच आदरपूर्ण विनम्रभाव आहे

( ४ ) अर्घ्यम् – म्हणजे पूजा सत्कारासाठी अर्पिलेले पाणी– निदान चार पळया, त्यात गंध, अक्षता व फुले एक दोन तरी असावी देवतेला अनुसरून अर्घ्यामध्यें दुर्वा, तुळशी, हळद, कुंकु व अक्षता किंवा जायफळ, लवंग, कंकोळ ( ह्याचे थोडें चूर्ण ) हे पदार्थही घालण्याची चाल आहे शिव व सूर्य ह्याशिवाय इतर देवतांना फसाने अर्घ्य देणे चांगले संध्येमध्यें जीं अर्घ्ये देतां ती केवळ पाण्याचीच असतात कारण तीं सूर्यमंडल मध्यस्थित तेजाला देत असतात पण पंचायतन पूजेंतील सूर्याचे प्रतिक स्फटिकमणि वा सूर्यकांत मणि असेल तर त्याला द्यावयाचे अर्घ्य इतर देवतांना द्यावयाच्या अर्घ्याप्रमाणेच द्यावयाचे असते. अर्घ्य हे देवतेच्या हातावर वा योग्य भागी द्यावे

( ५ ) आचमनीयम्– हे पिण्यासाठी किंवा चूळ भरण्यासाठी अशा हेतूने द्यावयाचे असते. म्हणून ते पाच सहा पळ्या देणे इष्ट हे शुद्ध पाणीच असून ते देवतेच्या मुखाजवळ न्यावयाचे असतें. देवपूजेंत अर्घ्यपात्र केवळ पळीशिवाय निराळें असावे. क्वचित् 'मधुपर्क' हा विधि विशेष प्रसंगी करण्याचा असतो. मधुपर्क ( म्हणजे दही व मध यामध्यें थोडें पाणी मिसळून देणे किंवा फक्त मधच ). हा विधि देवतेच्या सन्मानासाठी करितात लग्न-कार्यांतील 'मधुपर्क' या विधीतही सन्मान हाच मुख्य हेतु असतो पण नित्य पूजेंत तो न केला तरी चालतो

( ६ ) स्नान– हा षोडषोपचारामधील महत्वाचा उपचार आहे प्रथम शुद्धोदकाने स्नान नंतर हे पंचामृत स्नान ( दूध, दही, तूप, मध व साखर हे पाच पदार्थ म्हणजे पांच अमृते ) 'यत्पुरुषेण' या मंत्राने सुरू करावयाचे असते क्रमाने ते ते पदार्थ त्या मंत्राने देवाला अर्पून, ( देवावर ओतून वा चाळून ) प्रत्येक पदार्थ लावल्यानंतर शुद्ध पाणी ओतून, दुसरा पदार्थ अर्पण करावा अशी कृती पाच वेळा त्या त्या पदार्थासंबंधाचे मंत्र ( वैदिक वा पौराणिक म्हणत) करावयाची असते शर्करा स्नान हे अमृत, अंग स्वच्छ होण्यासाठी किती व्यवहारी धोरणाने शेवटी योजिलेले आहे, हे सहज ध्यानात येईल देवता प्रतीकातील तेज व कांति प्रतीत होण्यासाठी अशा पंचामृतस्नानाचा किती चांगला ( म्हणजे स्पंदन वाहकत्वासाठी किती चांगला ) उपयोग होईल वा होतो हे *अनुभवगम्य विज्ञान या स्नानविधींत* भरलेलें आहे. हं उपासकानी ध्यानात घ्यावे पंचामृतही नसेल तर केवळ दुग्धस्नानाने * त्याची पूर्णता होते

**सुगंधी तेल–अत्तर.**– हे देवाच्या मस्तकापासून पायापर्यन्त लावण्याचाही पर्याय आहे वेळ व पदार्थोपलब्धीप्रमाणे निरनिराळी सूक्ते म्हणत स्नानाभिषेक करावयाचा असतो यावेळी वाद्यनाद व घंटानादही करावा. धूपही जळत असावा या सर्वांचा अंतिम हेतु पूज्य पूजकाची म्हणजे देवता व उपासक, ह्यांची एकतानता व्हावी, हा आहे 'ओम् देवस्यत्वा'– अमृताभिषेकस्तु शांति पुष्टिस्तुष्टिश्चास्तु ' या मंत्राने अभिषेक पूर्ण होतो व मग देवाला शुद्धाचमन देऊन स्वच्छ व शुद्ध वस्त्राने पुसून आपापल्या जागी ठेवावे तेव्हा 'ओम् तदस्तु मित्रावरुणा हा मंत्र म्हणावयाचा असतो देवा, या वसा, स्थिर व्हा, या अर्थाचे 'सुस्थिरो भव, शांतो भव, अभिमुखो भव, सुप्रतिष्ठितो भव, वरदो भव हे शब्द म्हणून गंधपुष्पादि अर्पण करावयाचे असते

* १ दूध सामान्यत ताम्रपात्रांत घेऊ नये, पण हा निर्बंध स्नान, तर्पण, दान ह्या विधीत बाधक नाही ताम्राचा त्वरित अग्निवाहकत्व हा गुण ध्यानात घेऊनच हा निर्बंध सांगितलेला आहे

**( ७ ) वस्त्र** – देवतेला समर्पावयाचे, द्यावयाचे किंवा नेसवावयाचे वस्त्र, रेशमी वा कापसाचे न फाटके, धुतलेले किंवा कोरे असावे वस्त्र वा अलंकार रोज नवीन नसून तेच पाण्याने प्रोक्षण करून समर्पावे वस्त्राचा अभाव असता अक्षता किंवा तुलसीपत्र ( देवतायोग्य ते पत्र ) द्यावे देवता भिन्नत्वाप्रमाणे, वस्त्र भिन्न असावे ( जसे विष्णूला पिवळे, शंकराला पांढरे आणि गणपति, सूर्य व देवी ह्यांना लाल वस्त्र प्रिय ) तथापि शुभ्रवस्त्र सर्वदा चालते. शुभ्र वर्णात सर्व वर्णांचा–किरणांचा–रंगांचा समावेश आहे शुभ्रवर्ण तेजाचे प्रतीक आहे हे विज्ञान आहे

**( ८ ) उपवस्त्र**– नेसण्याचे वस्त्र दिल्यावर अंगावर घेण्याचे वस्त्र प्रतीक म्हणून ( उपवस्त्र–उपरणे ) यज्ञोपवीत द्यावे रोज नवीन नको स्त्री देवतेलाही यज्ञोपवीत समर्पण चालते त्याअभावी देवतेला अक्षतादि अर्पाव्या.

**( ९ ) गंधोपचारः**– * या उपचारात केशर–कस्तुरी, चंदन, हळदकुंकू, काजळ, सिंदूर, इत्यादि वस्तू येतात या वस्तू त्या त्या ठिकाणी समर्पाव्या ' गंधान् समर्पयामि ' असा शब्दप्रयोग या हेतूनेच आहे

**आभरणोपचार** – कंठसूत्र, कंकण इत्यादि अलंकार ते ते मंत्र म्हणत अर्पावे चंदन व कुंकू भालप्रदेशी, काजळ नेत्रांना, शेंदूर केसात व हळद गंडस्थळी किंवा कुंकवापूर्वी भालप्रदेशी अर्पावी

**( १० ते १३ ) पुष्पादि अर्पण व धूपदीप नैवेद्य समर्पण**– ह्याबद्दलही पुढे पूजासाहित्य समर्पण विज्ञान ह्यात स्थूल विचार केलेला आहे

---

* गंधोपचार अर्पण – ताम्रपात्रातील गंध, सहाणेवरील गंध चर्मपात्रातील गंगोदक देवाला समर्पण्यास अयोग्य, देवाना लावावयाचे गंध करांगुलीने वा त्या जवळील बोटाने म्हणजे अनामिकेने लावावे मनुष्याना मधल्या बोटाने व पितराना तर्जनीने ( आंगठ्याजवळील बोटाने ) लावावे त्या त्या स्थान स्थित देवता म्हणजे शक्ति यांशी ह्याचा संबंध या विषयी आहे त्यास विचारात याचा थोडा जास्त विचार केलेला आहे

( १४ ते १६ ) नमस्कार–प्रदक्षिणा व विसर्जन.– ह्याबद्दलही पुढें पूजा साहित्य समर्पण विधीत विचार केला आहे

पुष्पांजली व प्रार्थना – ह्यात देवदेवतापासून अपेक्षित ( सकल्पात विनती केल्याप्रमाणे अपेक्षित ) आशिर्वाद मिळावा म्हणून नम्रभावाने विधि-विधानातील चूकभूल इत्यादिकाबद्दल क्षमायाचना केलेली आहे अशा रीतीने ठराविक वेळी, ठराविक हेतुने, जीवशिवैक्य साधण्याचा नित्याचा प्रयत्न म्हणजे पूजाविधि हा एक मार्ग आहे त्यामुळें मन शांति, समाधान, मन स्थैर्य ह्या गोष्टी साधिता येतात व त्याचा योग्य तो परिणाम शरीरावर, त्याच्या शक्तीवर, कांतीवर दिसतो व वाढत जातो इति शम् '

# चतुर्थ दल

## पूजासाहित्यामधील विज्ञान रहस्यें

### पूजा साहित्य

( अ ) उपकरणीं – हे साहित्य ताम्रधातुचेच प्रशंसिलेले आहे कारण ताम्राचा आरोग्य व शीघ्रस्पदनवाहित्व ह्यांशीं घनिष्ट संबंध आहे देव्हारा नसल्यास देव ताब्याच्याच ताम्हनात किंवा ताब्याच्या कमलाकार भाड्यात ठेवावे असा निर्देश आहे पिण्याचे पाणी देखील ताम्रपात्रात ठेवून तेच प्यावे ताम्र हा पदार्थ आरोग्यवर्धक आहे असे वैद्यक बजाविते

( आ ) आसन – पूजकाचे आसन देवतास्थानापेक्षा खाली असावे त्यात पूजकाने देवतबद्दल आदर व्यक्त करण्याचा हेतु आहे पण पूजकाचे आसन जमिनीवरच ( प्रथम दर्भासन अथवा मृगचर्म घालून त्यावर ऊर्णासन ( लोकरीचे वस्त्र ) व त्यावर धौत कार्पासवस्त्र असावे. कारण बैठकीचा सबध मऊपणा, शीत निवारण, व शीघ्र स्पदन क्षमता ह्यांशीं पण

आहे. आरोग्य व देवपूजेतील एकतानता साधणे हे दूरदर्शी विज्ञान त्यात आहे.

( ६ ) **कलश, शंख, घंटा, दीपः–** या वस्तू देवपूजेंत आवश्यक असतात. नित्य व नैमित्तिक पूजेंत कलशपूजन हा विधि असतो कलशही ताम्याचाच असावा ( सोन्या चांदीचा त्याज्य नव्हे, पण तें वरील जसे सर्वसुलभ नव्हत व स्पंदनक्षमतेच्या दृष्टीनेही थोडे गौण ) असा आग्रह दर्शविलेला आहे. त्याचा मुख्य हेतु त्यांत घेतलेलें जल पूजेसाठीं मंत्रपूत करून मगच तें पूजाकर्मांत उपचार शुद्धीसाठीं तसेंच देवतेच्या म्हणजे अनिमानव अशा शक्तीच्या उपयोगासाठीं वापरावयाचें असतें. म्हणून त्या त्या अर्थाचे मंत्र म्हणत ते पवित्र करावयाचे असते. गंगोदकासारखे पवित्र जल त्या कलशात मिसळूनही तदर्थवाचक ' गंगे च यमुने चैव ' हा मंत्र म्हणतच कलश पूजन करावयाचे असते.

[illegible] × [illegible] या उजव्या
[illegible] स्नानात
[illegible] या देवतेचे
मंत्र म्हणजेच सूक्तें म्हणत स्नान, असे कृत्य असल्यानें त्यासाठी स्वतंत्र अभिषेक पात्र सामान्यतः ताम्याचे असावे तथापि देवता भिन्नत्वाप्रमाणे सुवर्णपात्र ( देवीला ) ताम्रपात्र ( गणपती व सूर्य यांना ) गव्याचे शिंग (शिवाला) व शंख ( विष्णूला ) असे प्रकारही सांगितलेले आहेत तथापि

× शंख– गोमुखी– व्याघ्रमुखी असे अनेक प्रकार शंखाचे आहेत तसेच उजवा शंख या शरीराशी ह्या वस्तु त्यांचे उपयोग व पूजा ह्यांचे शास्त्रही वेगळेंच आहे त्याचा प्रस्तुत विषयाशी संबंध नाही असे. त्याची घडण, त्यांचे प्राप्तिस्थान यावरूनही आधुनिक शास्त्रीय विज्ञान हा भाग आपल्या प्राचीन शास्त्रांनी पूर्ण जुळता व पटणारा आहे पण ते विचार येथ अप्रस्तुत आहेत बहुतेक उजवे शंख विषुववृत्ताच्या दक्षिणेकडील समुद्र किनाऱ्याच्या देशभागात आढळतात पृथ्वीच्या विषुववृत्तावरील गती व वारे यांशी शंख उजवा बनण्याचा संबंध आहे

शंकराशिवाय सर्व देवांना शंखोदकस्नान चालते तीर्थ म्हणूनही शंखोदक घेतात शंकराचे गभाऱ्यात शंख नसतात वैद्यशास्त्रात पचनक्रिया सुधारण्यासाठी जसे ताम्रपात्रोदक उपयोगी तसेच शंखोदक हे अपचनादि विकारावर शंख भस्मप्रमाण परिणाम करित क्षयासारख्या रोगात शंखोदकात इतर भस्मे वा औषधी द्रव्ये देण्याची प्रथा ( शंखपूजन मंत्रात ' त्रैलोक्य यानि तीर्थानि शंखे तिष्ठति ' हे भौतिक सत्य आहे) शंखातील गुणामुळेच आहे

घंटा – देव म्हणजे दिव्य वा सर्वश्रेष्ठ शक्ति मूर्तीत यावी व कार्यकारी व्हावी म्हणून देवतेला मंगल नादाने बोलावणे ( आगमार्थं तु देवानां व गमनार्थं तु रक्षसाम् ) हा हेतु घंटा हे साहित्य वापरण्यात आहे

दीप – दिवा हे अग्नीचे म्हणजे तेजाचे एक प्रतीक म्हणून देवतेजवळ असणारे साधन नंदादीप, अहोरात्र तेवत ठेवण्याचा दीप तो नंदादीप, व त्याशिवाय केवळ पूजेच्या वेळापुरेसा तजाळणारा ' निरांजन दीप किंवा पंचारति दीप लेजाळून देवतेसमोर ओवाळवा लागतो नीराजनदीप तुपाचा असून त्यात एक फुलवात असावी दीपातील वातीची संख्या विषम असावी, पण दोन वातीहि चालतात तेलाचा दिवा नंदादीप हा देवाच्या डाव्या बाजूला व तुपाचा दक्षिण ( उजव्या ) बाजूला किंवा समोर असावा नीराजन दीप देवाच्या पायापासून किंवा नाभीपासून दृष्टिपर्यन्तच उचलून सहा वेळा देवाच्या उजवीकडून डावीकडे ओवाळवा पण पंचारती ही देवाच्या डावीकडून उजवीकडे ओवाळावी दिव्याचे तोंड दक्षिण दिशेस नसावं, त्याचा व दक्षिणेकडे पाय करून झोप नये त्याचा संबंध ध्रुवाकर्षणाशी आहे, अनेक वाती ( वातिवर्ये ) असलेल्या दिव्याला दक्षिण दिशा वर्ज्य नाही पूजेच्या शेवटी करावयाची पंचारती दोन्ही हातांनी उचलून देवाच्या पायापासून मस्तकापर्यन्त तीन वेळा तरी ओवाळावी ×

× दीप ओवाळणे – देवतेसमोर नीराजनदीप कोठून कसा व किती वेळा ओवाळावा याबद्दल विष्णुरहस्य तृचाभास्कर इत्यादि ग्रंथात निरनिराळी मतें असून संप्रदायपरत्वेंही एकवाक्यता नाही चरणावरून ४ वेळ, नाभीपाशी २ वळा मुखावरून एक वेळ सर्वांगावरून ७ वेळ ओवाळावी असे निरनिराळे प्रकार सांगितलेले आहेत

## गंध, पुष्प, पर्ण, वर्ज्यावर्ज्य व विज्ञान :–

गंध, हळदकुंकू, व श्वेतपुष्पें, तसेच अक्षता व दूध ह्या वस्तु, हे पूजेंतील उपचार सर्व देवदेवतांना अर्पण करण्यासाठीं चालतात. तथापि देवता भिन्नत्वा प्रमाणे म्हणजे देवतारूप शक्ति केंद्रातील घटकाच्या भिन्नत्वाप्रमाणे गंध व त्याचे घटक, भिन्नभिन्न जातीची, वासाची व रंगाची फुले व पत्रपत्री आणि ती देवाला अर्पण करण्याची पद्धती, नैवेद्य व त्याचे प्रकार, नैवेद्य अर्पण करण्याची रीत, धूपदीपादि प्रकार व ओवाळण्याची पद्धति, अक्षता समर्पण विधि, पुष्पांजली, प्रार्थना व समारोप इत्यादि सर्व उपचाराचा सूक्ष्म व पूजकांच्या व्यवहारी परिस्थितीचा विचार करून उत्कृष्ट मार्गदर्शन उपासनाप्रेरक ऋषिमुनींनी फार कुशलतेने चिकित्सक व विज्ञानी दृष्टीने केलेले आहे त्याचे स्थूल विवेचन पुढें दिले आहे

**गंध** – चंदनाचें पांढरे किंवा लाल गंध, तसेच केशरी रंगाचे सुवासपूर्ण अष्टगंध (आठ प्रकारच्या सुवासिक पदार्थ मिळून केलेले तें अष्टगंध, ते देवता भिन्नत्वाप्रमाणे जरी भिन्न असते, तरी त्यात चंदन, केशर, कस्तुरी, गुग्गुल अगरु जटामासी, सालवेल इत्यादि सुगंधी व आरोग्यदायक व वर्धक पदार्थ असतात ) गंधार्पण हें मन प्रसन्न करण्याचें साधन असतें. धूपांत देखील अष्टांग धूप, दशांग धूप, वा केवळ चंदन हे पदार्थही अशाच प्रसन्नतेसाठीं वापरावयाचे असतात. विष्णूला उभें गंध, शंकराला त्रिरेखात्मक आडवे व इतरांना टिळा असा गंधलेपन विधि आहे, त्यातही विज्ञान आहे

**पुष्पें व पत्री** :– देवदेवतेला कोणती फुले कोठे कशी वहावी, तसेच तुलसी दूर्वा बेल आदि वनस्पति पत्री कोणाला, कोठें कशी वहावी ह्याचे बारीक वर्णन शास्त्रविधीत केलेले आहे ते कसे ते पाहूं या– ( १ ) सर्व देवाना प्रिय अशी फुलें– जाई,जुई कुंद चाफा, मोगरा, नाग–केशर, अगस्ति, पुष्प, बकुल, पारिजात, कण्हेर, कमळ, मालती, गुलाब, अनंत ही सर्व सुवासिक पुष्पें आहेत त्यातही 'ऋतुकालोद्भव पुष्पाणि समर्पयामि' असे दूरदर्शी

व्यवहारी वर्णन आहे. सर्व पुष्पें ताजी व खराब न झालेली असावी पुष्पादि साहित्य होता होईतो शुद्ध पूजकाने जमवणे, यांत देवताकृपेसाठी स्वतः झटणें हें तप आहे.

बेल, तुलसी, दुर्वा, शमी ही सर्व प्रकारच्या पूजेंत देवताभिन्नत्वाप्रमाणे अर्पावयाची अशी ही सर्वसामान्य पत्री आहे विशिष्ट पूजेंत विशिष्टवाली वहावयाची पत्री त्याचे प्रकार व संख्या ही निरनिराळी आहेत

पुष्पार्पण व विज्ञान — फुलें जशीं सृष्टीमध्यें उत्पन्न झालीं, त्या पद्धतीनेंच तीं देवाला वहावीं. म्हणजे पुष्पाचा देठ, देवतेकडे वरून पूजकाकडे पुष्पाचें स्वरूप राहील अशा रीतीनें देवतेच्या त्या त्या भागावर पुष्पें वहावी. देवमूर्ति, वा मणि किंवा देवतापंचायतन हा एक संट अशा रीतीने सजवावा की, तें दृश्य आकर्षक दिसावे या रीतीने पूजा करीत असताना पूजकाचे नेत्र, हस्त व मन ही एकाच स्थानी केंद्रित रहावी तेवढा वेळ तरी पूजकाच्या मनाला बाह्य जगाचा विसर पडल्या असतो या कृतीच्या जोडीला अर्थाकडे लक्ष देऊन मंत्रसूक्ते, म्हणताना वाचा व चित्त याची एकतानता व जोड व त्यावरोबर मंद सुवासाने ( घ्राणेंद्रियाचा लय ) आणि मंजुळ व मधुर नादानें कर्णेंद्रियाची सांगड वा जोड इतर इंद्रियावरावर केली जाते अशा रीतीनें पूजा सर्वोपर्यन्त व्यक्तीचे चावट व बहिर्मुख मन स्वतःच्या विगलन किंवा मारून चित्तामार्गेच शिवाकडे ओढले जाते अशी नित्याची ठराविक वेळेची सवय होता होता लययोगाचा प्रारंभ होतो ही कमाई हात राहिली म्हणजे चित्त स्थिरावत जाते, त्या योगाने तेवढा काळ तरी उन्या सात्विक आनंदात जाता व तसा जावा ह्या मानसशास्त्रीय उच्च स्तरावरील विचार विज्ञानाच्या आधारावर पूजाविधीसारखे अनेक उपाय व योजना भारतीय हिंदू धर्मांत ठिकठिकाणी जागोजाग भरलेले आहेत, व ते विषयपरत्वें व प्रसंगपरत्वे पुढे विशद केले जातील

## पुष्प पत्री वर्ज्यावर्ज्यत्व व विज्ञान

१) गणपतीला– तुळस वर्ज्य, पण दूर्वा ( अति प्रिय ) शमी व रुईही अर्पणीय ( नर्मदेतील तांबडा पाषाण हे गणपतीचे प्रतीक ) तांबडी फुले व शेंदूर हे पदार्थ– रक्तवर्णी वस्तू जास्त प्रिय

२) शंकराला– केतकी व तुळस ( वैकुंठ चतुर्दशीला विशेष महत्त्वाची-चालते, तसा विष्णूला बेल) वर्ज्य पण बेल अत्यंत प्रिय ( बाण किंवा लिंग हे शंकराचे प्रतीक ) तसेच केवडा वर्ज्य कुंद, कोरांटी, पांढरी कण्हेर, प्रिय *

३) विष्णूला– तुळस पत्र– तुळस मंजिरी अतिप्रिय ( विष्णूचे प्रतिक शालिग्राम किंवा बाळकृष्ण वगैरे चतुर्भुज मूर्ति )

४) सूर्याला– तगर, अगस्ति व बेल हीं वर्ज्य. इतर उदा० तुळसी, आघाडा इ. चालतील ( सूर्यकान्त मणी किंवा स्फटिकाचा बाटोळा मणि हे सूर्याचे प्रतीक ) तसेच लाल कण्हेर, जाई, गुलाब चालतील

५) देवीला– बेल प्रिय पण रुई व मदार वर्ज्य. तसेच लाल कण्हेर, जाई, गुलाब प्रिय 'दुर्गा' नावाच्या देवीला दुर्वा वर्ज्य ( सुवर्ण किंवा पचरसी धातुमूर्ति हें प्रतीक क्वचित् ललिता देवीचे करंडयाचे झाकण ही, ) पण पार्वती, महालक्ष्मी वगैरे सरस्वती नामक देवीला दूर्वा वर्ज्य नाहीत

---

* तुळस शंकराला निषिद्ध नाही नित्य घातली तरी चालते असे एकादशी महात्म्यात स्पष्ट आहे तसेच विष्णूला बेल वर्ज्य नाही केव्हाही समर्पण करावा

## पञ्चायतनांत वर्ज्या वर्ज्यनाहीं

दुर्वा, बेल, तुलसी, पारिजातक, नागकेशर याचा अश्वत्थ, औदुंबर तसेच अष्ट गंधातील जटामासी, सालवेल ह्या वनस्पती इत्यादि वनस्पतींचा मनुष्याच्या विशेषत स्त्रियांच्या आरोग्यार्थी व रोगनिवारणार्थी घनिष्ट संबंध आहे कियहुना सदरहू पदार्थांचा ठराविक वार व नक्षत्र ह्यांशींही वैद्यकशास्त्रदृष्ट्या अनुभवाचा संबंध आहे.* म्हणून वर्ज्यावर्ज्य हा उल्लेख आहे याचा अर्थ पूजाविधि व पूजोपचार ह्याची आरोग्य व ' शरीर रक्षितो धर्म ' या न्यायाने दूरदर्शी व्यवहारी सागड घातलेली आहे फार काय सांगावे फुले, मिळाली न मिळाली तरीही, केवळ अक्षता वा तुलसीपत्र अर्पण केलीं तरीही सर्व पूजा केलीसे होते. ( ' पत्र पुष्प फल, तोयं ' एवढ्यावरही भागते ) तसेच ताजीं फुले न मिळाली तरीही शिळी असून चांगली असतील तर तीं तुलसी दलाने गंगोदक शिंपून पुन उपयोगार्थ असा पर्याय सुचविला आहे ( पर्युषितैश्चापि-शिळी-पुष्पार्थैरबिल्वैरपि गंधोदकेन चैतानि त्रि प्रोक्ष्य एव

* वैद्यकीय सबंध – दूर्वा प्रदरनाशक व पाचक, शमी तेजोत्पादक, लाल गाडेरी जास्वद मधुमेहनाशक आहे दसऱ्याचे शमीपूजन तेजतत्त्ववर्धक व दर्शक आहे. तुळस– वातनाशक व शामक, विषहारक म्हणून अनुपान योग्य, हवा शुद्धिकारक, सरपटणारे प्राणी प्रतिबंधक, औदुंबर– विषनाशक –शामक प्रदरनाशक पळस– क्रिमयोपयोगी पाराबद्धता, जखम भरणे, कृमिनाशक भोंग्रा– क्रिमयोपयोगी, शौचरोधक – गुंगी आणणारा पिंपळ– वंध्योत्वोपयोगी, रेडियम युक्त, श्वासकासादि विकारोपयोगी, बेल-मलसचय नाशक, सर्दीनाशक, सप्तधातूची शुद्धि करून तेज उत्पन्न करणारे बेलफळ, त्रिदोषनाशक, बिल्वपत्र पाचितजल जंतुघ्न व वंधेत्वकवर्धक व मधुमेहनाशक आहे वड– सौभाग्यवर्धक – वडाचा चीक – मधुमेहहारक, दतपक्ति मजबूत ठेवणारे लाल जास्वंद– मधुमेहहारक – लाल कण्हेर– विषकारी, अगस्तिपुष्प– पाचक मारक – बद्धकोष्टनाशक

प्रपूजयेत् ' अशी सोय आहे ) तसेंच तुळस दहा दिवस, बेल पांच दिवस, कमळ तीन दिवस व पळस फूल एक दिवस शिळें होत नाहीं.

अक्षतांचें सर्वश्रेष्ठत्व ×:— देवपूजेच्या षोडषोपचारात गणना नसूनही त्या अक्षता या उपचाराशिवाय, कोणत्याही प्रकारची देवपूजा ' साग ' म्हणजे पूर्ण —( खंडित नाही अशी ) होत नाही न मिळणाऱ्या कोणत्याही उपचारा बद्दल अक्षता अर्पाव्या असे शास्त्र सांगतें. अक्षत म्हणजे न तुटका न मोडलेला म्हणजे पूर्ण असा अक्षता या शब्दानें सामान्यत न तुटलेले तांदुळ असा अर्थ मुख्यत दाक्षिणात्यातील कर्मकाण्डी समजतात हिंदु धर्मातील सर्व धर्मकार्यात —लग्न मौज —होमहवन वा यज्ञ —अत्यसंस्कारातर्गत उत्तर क्रियादि कार्यातही ' अक्षता ' हा पदार्थ लागतोच पण यव —गहू —ज्वारी हे पदार्थही लग्नादि शुभ कार्यांत उत्तर भारतीयातही अक्षता म्हणून वापरले जातात. " अक्षतास्तु यवा प्रोक्ता, " हे वचन आहे पण देवपूजेंत मात्र अक्षता म्हणजे तांदूळच लागतात. अक्षता म्हणजे धानाचे म्हणजे भाताचे तादुळ हे समृद्धि, वा परिपूर्णता, या हेतूनें व अर्थानें वापरले जातात, आशीर्वादात्मक क्रिया भाताच्या तादुळानीच ( तंडुलानीं ) अभिव्यक्त केली जाते. यातील विज्ञान असे आहे —पृथ्वीवर उत्पन्न होणाऱ्या सर्व धान्यामध्यें—एकदलीय वा द्विदलीय धान्यामध्ये—धानाच म्हणजे भाताचे तादुळ हे असे धान्य आहे की, त्याच्या एका दाण्यापासून सर्वांत जास्त दाणे उत्पन्न होतात. म्हणजे तें बहुप्रसवी म्हणजे समृद्धिदायी धान्य आहे. तसे जव, गहू इत्यादि

× अक्षता बहुप्रसवीः— भारत, चीन, आग्नेय आशिया, जपान हे जगातील जास्त वस्तीचे देश असून त्यात खाद्य धान्यात तांदुळ हाच मुख्य पदार्थ आहे तो पदार्थ त्याच भागात सर्वात जास्त पिकतो व तो तें खातात, उलट गहूं हेच मुख्य खाद्यान्न आहे पण यव, गहू पिकविणाऱ्या देशात लोकवस्ती कमीच आहे ज्हावा जावा म्हणजे यवद्वीप यात तांदूळ हे मुख्य पीक व मुख्य खाद्यान्न आहे. तेथेंही फार दाट लोकवस्ती आहे ( ९ ते १० कोटी ) तांदूळ या खाद्यान्नामुळें बहुप्रसवत्वाला मदत होते

कोणतेही धान्य बहुप्रसवी नाही या वस्तुस्थितीवरून ताडुलाक्षताचे महत्व ध्यानात येईल हिंदु धर्मातील कर्मकाण्ड प्रणेत्या ऋषिवर्यांचें सूक्ष्म निरीक्षण व दूरदृष्टि कोणत्या प्रकारची होती याचें अक्षता योजना हें आणखी एक अति महत्वाचें उदाहरण आहे

पत्र-पुष्प फलसमर्पण – जसे पुष्पें कशी वहावी, तसे बेल, तुळशी, दुर्वादि पत्रें कशी वहावी ह्याचेही मार्गदर्शन विचारपूर्वक केलेले आहे व ते असे – तुळसीपत्र या मंजिरी उपासकाकडे अग्र करून उपडें वहावे, दूर्वा उपासकाकडें अग्रें करून वहाव्या तसेच बिल्वपत्र उपडें पूजकाकडे अग्रें करून पण बिल्व-दल ( त्रिदल– चतुर्दल वा पंचदल ) पूजकाकडे अग्रें करून उपडें वहावे हे नियम विविध अनेक पुष्पें वा पत्रीं वहावयाची असताना पाळण्याचे कारण नाहीं विडयाची पाने उताणी व आपलेकडे अग्र करून ठेवावी

[illegible] अग्र करून [illegible] फळें उर्ध्व [illegible] स्थितीत किंवा पद्धतीनें उत्पन्न केलीं, तशा स्थितीत तीं देवदेवताना अर्पण करावीं, अशी योजना कर्मकाण्डात सांगितलेली आहे, असे स्पष्ट होते म्हणजेच निसर्गाशी म्हणजे परमेश्वराच्या कृतीशीं एकरूप व्हावें, ती कृती करीत असताना जीव शिवाचें ऐक्य साधावयाचें हा उदात्तपणाचा कृतिप्रधान हेतू पूजा विधीमध्यें म्हणजे अर्चन ह्या नऊ पैकीं एका भक्तीमध्यें आहे.

### पक्वपक्वान्नांचे नैवेद्य व फल ताम्बूल समर्पण–कृति

सगुण पूजेंतील नैवद्य समर्पण करणे हा एक महत्वाचा उपचार आहे अन्ननिवेदन करणे म्हणजे नैवेद्य समर्पण करणे देवतारूपी सूक्ष्म ( स्थूल-पार्थिव नव्हे ) शक्तीला स्वच्छ वृत्तीनें सोवळ्यानें– पवित्र व शुद्ध मनानें केवळ आपल्याच त्या देवतेसाठीं शुद्धभावानें तयार केलेली भक्ष्य भोज्य, लेह्य, चोष्य, व पेय यापैकीं कोणत्याही एका प्रकारची भौतिक वस्तू अर्पण करावयाची असते. ती कशी द्यावयाची त्याची मांडणी अशी – अर्पण

करावयाचा पदार्थ तो एका पात्रात देवापुढें वा बाजूला पाण्यानें एक चतुरस्त्र मंडल करून ते नैवेद्यपात्र पाटावर ठेवावे. त्यावर गायत्री मंत्र म्हणून तुलसी–पत्राने प्रोक्षण करावे. पात्रासभोवार 'सत्यं त्वरतेन परिषिंचामि' असे म्हणून पाणी फिरवून 'अमृतोपस्तरणमसि' असे म्हणून अपोशन द्यावे व मग डोळे मिटून देवतेची आकृति डोळ्यासमोर आणून 'मृगी' मुद्रेनें देवतेच्या मुखाकडे त्या नैवेद्यावरून हात करत 'ॐ प्राणाय स्वाहा,'– 'ओम् अपानाय स्वाहा' इत्यादि मंत्रांनी पाच ग्रास देऊन, सहावा ग्रास 'ॐ ब्रह्मणे स्वाहा' असे म्हणून द्यावा. मग मध्यें पिण्यासाठी म्हणून थोडें पाणी द्यावयाचे व पुन पूर्ववत् मंत्र म्हणून सहा घास अर्पण करावयाचे. नंतर 'उत्तरापोशन हस्तमुखप्रक्षालन समर्पयामि' असे म्हणून पुन पळीभर पाणी द्यावें.

विज्ञानः–'देव हा वासाचा धनी' अशी म्हण आहे, त्यात अर्थ आहे. देवाला नैवेद्य वरील पद्धतीने अर्पण करित असताना डावा हात पूजकाने हृदयाला लावून मान खालीं हृदयाकडे वळवून आपण देवाला नैवेद्य पदार्थ देत आहोंत हा अंतकरणांतील भावनेशीं एकरूप होऊन ताज्या नैवेद्यपदार्थांचा वास जणुं काय देवतेच्या मुखाकडे नेत आहों अशी कृति उजव्या हाताच्या 'मृगी' मुद्रेच्या हालचालीनें व्यक्त करावयाची असते. मन चित्तांत विरून जातें. देवतेच्या नैवेद्यावर कोणाची दृष्टि पडू नये म्हणून त्यावर झाकण असावे. ते काढून मगच नैवेद्य अर्पावा. देवालयात देवाला नैवेद्य अर्पण करीत असताना पडदा सोडितात, तो यासाठीच.

पंचपक्वान्नांचें स्वरूपः– ( १ ) भक्ष्य पदार्थ– भाकरी पोळी– इत्यादि ( २ ) भोज्य पदार्थः– भात वा खिचडीचे अनेक प्रकार ( ३ ) लेह्यः– पंचामृत, खीर, लोणचे, मिरची, इत्यादि चाटून खाण्याचे पदार्थ ( ४ ) चोष्य– चोखून खाण्याजोगें आंब्यासारखे पदार्थ ( ५ ) पेय– दूध, लापशी इत्यादि शक्य तो शिजलेले पदार्थ अर्पण करावे– यावरून पचपक्वान्ने म्हणजे काय हें ध्यानात येईल

सामान्यत महाराष्ट्रीय पद्धतीच्या महानैवेद्यात वरील बहुतेक सर्व पदार्थ असतात. पत्रपुष्पाप्रमाणे देवदेवताना प्रिय असेही पदार्थ शास्त्रात सांगितलेले आहेत. ते असे–मोदक, गुळ (गणपतीला), खीर (विष्णूला); गुळभात ( सूर्याला ), शिरा (देवीला), दहीभात ( शंकराला ) हे पदार्थ विशेष प्रिय तांबूल * समर्पण नित्य पूजेत असावा, पण त्याचप्रमाणे दक्षिणा न ठेविली तरी चालेल तथापि आम्ही मात्र ठेवतातच नीराजन दीपाबद्दल वर वर्णन आले आहे

प्रदक्षिणा व नमस्कारः– देवघरातील नित्य पूजेत जरी प्रदक्षिणा नवो, तरी ती स्वतःभोवतीच करावी देवालयातील पूजाविधिमध्यें प्रदक्षिणा हवी. देवता भिन्नत्वाप्रमाणे ( गणपतीला ) १ वा ३, ( शंकराला ) सोमसूत्री किंवा अर्धी, ( विष्णूला ) चार, ( सूर्याला ) दोन किंवा सात व (देवीला) एक नमस्कार मात्र करावाच साष्टांग नमस्कार, सर्वांत उत्तम यानतर पुन आरती मंत्रपुष्पांजली (देवे ) मग मनजप करून तो देवाच्या उजव्या हातावर उदक सोडून देवालाच अर्पण करावा देवाच्या बेंकेत ही पूजकाच्या खाती जमा असते मग ' आवाहन न जानामि इत्यादि मंत्रनी क्षमा प्रार्थना व इष्ट वस्तूची याचना आणि तीर्थ ग्रहण केले की पूजाविधि संपला

निर्माल्य विसर्जन व विज्ञान·– देवपूजेपूर्वी म्हणजे सकाळीं लवकर निर्माल्य ( देवावर अर्पिलेले उपचार ) काढून तो ' उत्तरे विसृज्य ' उत्तरेस टाकावा असे का ? नीराजन ज्वाला, तीर्थ व शंखोदक ह्यांचा आरोग्य व अध्यात्मिक सूक्ष्म शक्ति ह्यांशीं जसा संबंध आहे. तसा निर्माल्याचा संबंध भक्तोपासकाशीं आहे. त्याचा विचार असा:–

---

* पानवेलीची दोन पाने, त्याला चुना व वर सुपारी हा साधा विडा, पण ( १ ) शिरा काढलेली पानें, फोडलेली सुपारी, चुना, कात, केशर, कस्तुरी, बदाम, अक्रोड, जायपत्री जायफळ, वेलदोडा, लवंग, व स्वर्ण–सोनेरीवर्ख हा त्रयोदश गुणी विडा होय

प्रत्येक देवतेचे — सूक्ष्मदावतीचे — भोवती भक्तपरिवारमय सेवक, याना 'पार्षद' असे म्हणतात — त्या सूक्ष्म शक्तींशीं निगडित अशा अंशशक्त्या म्हणजे ते पार्षद असतात व त्याचे पूजन देवतेच्या पूजेनंतर उत्तराग पूजा म्हणून ( म्हणजे त्या पार्षदाची नावे घेणे ) करितात. हें कृत्य नित्य पूजेंत नसते— त्यामुळें त्या देवतेचा निर्माल्य हा प्रसाद म्हणून त्या पार्षदांना द्यावयाचा. ते पार्षद उत्तरेकडे असतात. म्हणून निर्माल्य त्या दिशेला टाकावयाचा.

'इलेक्ट्रॉनिक्स' च्या मदतीने जशी हल्ली अवकाशसंशोधनी कार्यें केली जातात, त्याप्रमाणे या पार्षदरूप शक्त्या त्या देवतेशीं अग्रभूतत्वानें निगडित असतात. म्हणून त्यांच्या संपर्कानें कार्य साधवयाचे असतें. त्या त्या देवतेचे पार्षद गण ठराविक क्रमाने पुढें दिले आहेत.

( १ ) गणपतीचे— गणेश, गालव, गार्ग्य, मुद्‌गल, सुधाकर; ( २ ) शिवाचे— बाण, रावण, चंडीश, नंदी, भृंगी, रिती; ( ३ ) विष्णूचे— रमा, ब्रह्मा, शुक, सनक, सुनन्दन, सनातन, सनत्कुमार, विश्वक्सेन, उद्धव-अक्रूर; ( ४ ) सूर्याचे— माठर, पिंगल, दंड, चडांशु, (५) देवीचे— शक्ति, उच्छिष्ट, चाडाली, गणेश, रवि, चंद्र

## जपगणना, साहित्य व विज्ञान

कोणत्याही संकल्पानें केलेल्या नित्य वा नैमित्तिक उपासनेनिमित्त केलेल्या मंत्रजपाची गणना म्हणजे गणती, मोजणी करणे आवश्यक असते. कारण मंत्रजपस्पंदनानीं शक्तिप्रवाह उत्पन्न होत असतो व तो प्रवाह केवढा मोठा, केवढया शक्तीचा असावा व आहे हें समजणें जरूर असतें. त्या प्रवाहाची घनता किंवा दार्ढ्य जेवढें असेल, त्याच्या सहाय्यानें जापकाचें सामर्थ्य अजमाविता येते. याचा अर्थ जापकाने उत्पन्न केलेले शक्तिकेंद्र ( Power House ) किती शक्तिशाली आहे, हें त्या गणनेवरून ठरवितां येते. त्यामुळें त्याचें मापक म्हणजे 'मीटर' असणें जरूर म्हणून जपगणना करण्याची माला हे, त्याचे मीटर होय सदरहू मापकाची बनावट कशी असावी, आकार

केवढा असावा, त्या मापकातील शक्तिवाहक शक्ति संग्राहक व शक्तिवितरक केंद्रे व कशा प्रकारचे असावे, या सर्वांचे अनुभवगम्य व अनुभवजन्य असे शास्त्र भारतीय तज्ञ ऋषिमुनींनी म्हणजे शास्त्रज्ञांनी (Scientists) बनविले आहे म्हणून त्याचे स्थूल ज्ञान तरी असणे जरूर. वास्तवस्पाकडे वळा।





जपमाला साहित्य व प्रकार– जपमाला म्हणजे जपगणनेचे मीटर. वर्णमाला, करमाला व बीजमाला असे मालेचे तीन प्रकार आहेत

वर्ण म्हणजे अक्षरे 'अ' पासून 'ह' पर्यन्त (सोळा स्वर व तीस व्यंजने व पुढे ह पर्यन्त चार) अशी ५० अक्षरे उर्फ वर्ण होतात मंत्राच्या प्रारंभी किंवा शेवटी प्रत्येक वर्ण सानुस्वार उच्चारणे जसे– अं, आं, ईं कं, खं, घं, यं, शं, हं, पर्यन्त एकदा मंत्र जपून मग हं, सं, षं, शं, . अं पर्यंत उलट क्रमाने म्हणजे अनुलोम व विलोम पद्धतीने जप केल्यास तो संख्या शंभर होते यानंतर पुन अकार व कादिसप्तवर्ग जसे– अं, कं, चं, टं, तं, पं, यं, शं, असे आठ वर्ण घेऊन जपसंख्या १०८ होते क्ष,–क्ष हे अक्षर म्हणजे विलोमाचा मेरुमणी समजून तो ओलांडावयाचा नसतो अशा प्रकारच्या अक्षर मालेला मनोमाला किंवा अ–क्ष, माला असे म्हणतात अशा मालेत वर्ण हेच मीटरचे साहित्य किंवा घटक असते अशा प्रकारच्या जपगणना पद्धतीला अभ्यास व दक्षता लागते ही पद्धति मनाच्या केंद्रीकरणावर अवलंबून असते यामुळे ही पद्धति सुलभ, सुगम व सुसाध्य नव्हे

( २ ) करमाला.— हाताच्या चार अंगुल्या व त्याची फक्त दहा पेरे उलट मुलट पद्धतिने अंगुष्ठाच्या अग्राने त्या दहा पेराना स्पर्श करुन दशमापाने संख्या मोजावयाची जसे . अनामिकेच्या ( करांगुलीजवळच्या बोटाच्या ) मध्य पेरापासून प्रारंभ करुन करांगुलीची ( कनिष्ठिकेची ) तीन पेरें — मूल, मध्य, अग्र, — अनामिका व मध्यमा याची अग्रे आणि तर्जनीचे ( आंगठ्याजवळील बोटाचे ) अग्र, मध्य व मूल ह्याना अंगुष्ठाग्राने स्पर्श करण्याने दहा ही गणना होते — मध्यमेचे मूल व मध्य ही दोन पेरे मेरुमणि समजून ओलांडू नये व मग उलट तर्जनीचे मूल—मध्य अग्र अशाक्रमाने पूर्ववत् अनामिकेच्या मध्यापर्यंत यावयाचे या करमाला पद्धतीने दशसंख्येनेच गणना होत असते तसेच या पद्धतींतही मनाला अवधानाने बधित करुन ठेवावेच लागते या पद्धतींतही मन व अंगुल्या ह्या दोहोंचा समन्वय करावयाचा असतो. सारांश, अक्षमाला व करमाला ह्या दोन्ही जपगणनापद्धतींत इतर कोणत्याही वस्तूंचें सहाय्य लागत नाहीं.

( ३ ) बीजमाला — तुलसी वा चंदनकाष्ठ, कमल बीजमणि ( कमलाक्ष ), पावळें, रुद्राक्ष, मोती, स्फटिक सुवर्ण, रजतमणि, नीलमणि वज्रमणि पदमरागमणि इत्यादि अनेक वस्तूंची माला बनवून तद्वारे जपगणना करणे ह्याला बीज माला साहित्य गणना म्हणतात.

मणि वा बीज गुंफण पद्धति — बीज वा मणि, सुवर्ण, रजत, किंवा रेशमी सूत्रात गुंफावे प्रत्येक मण्यामध्यें गाठ असावी मणि मुखापुढें मणिमुख किंवा पुच्छाकडे पुच्छ असावे मोठा मणि मेरुमणि असून तो ऊर्ध्व मुख असावा, आणि अशा रीतीने तयार केलेल्या मालेवर पुढील संस्कार करून मगच ती जपामाठी घ्यावी अशा या बीज गुंफण पद्धतीमध्यें अंगुल्याग्र—जनित स्पंदनें मण्यामार्फत सौकर्यानें व त्वरित प्रसृत होऊन ती स्पंदनोद्भूत शक्ति शरीरात प्रसारित व्हावी हें ध्येय आहे.

जपमाला संस्कार.— आचमनादि देशकालादि उच्चार करून "श्रीपरमेश्वर प्रीत्यर्थ नूतन घटितायां मालायां पूजाजपानुष्ठानार्हतासिध्यर्थं तत्संस्कार करिष्ये " असे म्हणून ' ओम् ह्रीं सिद्धये नमः ' या मंत्रानें मालेवर गधोदकधार

अर्थाचा व मग ' ॐ ग अविघ्न कुरु माले त्वं गृह्णामि दक्षिणे करे, जपकाले तु मनन प्रसीद मम सिद्धये, असे आवाहन करून ती माला मस्तकावर धारण करून वस्त्रात किंवा गोमुखीत घेऊन हृदयाशी धरून देवतेचे वा मंत्रार्थाचे चिंतन करीत जप जपावा. अनामिकेवर माला धरून अंगुष्ठाग्राने मणि फिरवीत जावे. मेरुमण्याशी येताच माला फिरवून पुन: जप सुरू करावा. जप पूर्ण होताच, ' गुह्यातिगुह्य गोप्त्री त्वं गृहाण मत्कृतं जपम् सिद्धिर्भवतु मे देवि त्वत्प्रसादान्महेश्वरी ' असे म्हणून देवतेच्या वाम हस्तावर उदक देऊन जप देवतेला अर्पण करावा. पुरुष देवता असेल तर ' —गोप्ता त्वं सिद्धिर्भवतु मे देव त्वत्प्रसादान्महेश्वर ' असा मंत्र म्हणावा. असे केल्याने उपासकाच्या नावाने देवतेच्या बँकेत जपरूपी भांडवल जमा होत असते. त्यामुळे उपासक धनको बनून देवता पुण्य संचयाची संरक्षक ऋणको बनून रहाते. •

भाषा साहित्य, मणि संख्या आणि विज्ञान – माळेतील मण्यांची संख्या सामान्यत: एकशे आठ ( मेरुमणि १०९ वा ) असावी, पण २७ किंवा ५४ ही पण मणि संख्या असल्यास चालते. संख्याशास्त्र शून्यापासून अनंतापर्यंत पसरलेले आहे. शून्यलब्धि मे अनंत या संख्याशास्त्रात ( Science of Numerology ) अनेक तत्त्वज्ञानाची आधिभौतिक विज्ञानाची, तसेच दैविक आणि आध्यात्मिक ज्ञानाची गूढे भरलेली आहेत. शून्यानंतर १ ते ९ व नंतर शून्यच. एकं पासून परार्धपर्यंतची भारतीय संख्यात्मक गणना पद्धति १८ विविध अंकांची आहे. अशा प्रकारची विविध नावांची व अंकांची संख्या गणना पद्धति जगातील इतर कोणत्याही प्रगत समाजगटात नाही. ही भारतीय संख्यागणना पद्धति विशेषत: आहे. या संख्याशास्त्राचा संबंध

मनुष्यासंबंधीच्या सामुद्रिकशास्त्राशी, ज्योतिःशास्त्राशी, तदंगभूत नवग्रहोपासनेशी, दैविकशक्तीच्या नऊ अंगांशी, योगशास्त्रीय सप्तचक्रे ते महद्धारा पर्यन्तच्या शक्ति केंद्रस्थानांशी, त्याचप्रमाणे मानवी शरीरांतील उच्चार नलिकांशी संबंध असून ते सर्व १ ते ९ या आकड्यात परिगणित आहेत शरीरारोग्यशास्त्रांतील नवरसांशी, गायनशास्त्रातील मुख्य नवरागांशी व नवरत्नांशी संबंधित अशी ९ ही संख्या आहे सारांश १ ते ९ या आकड्यांना वैज्ञानिक महत्त्व आहे. हे ध्यानांत घेऊनच मालेतील मण्यांची संख्या देखील

२७, ५४, १०८ म्हणजे ९ या आंकड्यांशी संबंधित परिगणनेशी जोडिलेली आहे. ख्रिस्ती, ज्यू, मुसलमान लोकात जप गणनेसाठी माला वापरतात; पण मालेची मणिसंख्या वा गुंफण पद्धति किंवा माळेचे साहित्य ह्यांतआम्हा हिंदुधर्मीयाइतकी सूक्ष्म दृष्टि व चिकित्सा व त्या माळेवरील संस्कार ही दृष्टि व कृतीही त्यामध्ये नाही जैन व बौद्ध यामध्ये हिंदुधर्मीयाप्रमाणे बरोबर सूक्ष्म दृष्टि जपसाहित्याबद्दल आहे

*बीजमाला साहित्य व विज्ञानः—* खालच्या कोष्टकावरून बीजमाला साहित्याचा व्यवहार, आरोग्य व परमार्थ ह्यांशी कसा संबंध आहे हे ध्यानात येईल . जपमाला वस्त्राच्छादित किंवा गोमुखी सारख्या रेशमी पिशवीत नाभिस्थानाजवळच का असावी ? मंत्रोच्चारजनित स्पंदनें व देहस्थित कुंडलिनी शक्तिस्थान यांचा त्वरित संपर्क घडावा हाच उद्देश या कृतीमध्ये आहे.

| माळा साहित्याचें नांव | उपयोग | जप परिणाम[2] व देहावर परिणाम |
|---|---|---|
| १ पोवळें | देवी गणपति वा मंगळ ह्यांना प्रिय | सहस्रपट–पित्तशामक |
| २ मोती | सद्य फलदायी–संपत्ति समृद्धिकारक–मोक्षलाभार्थ | लक्षपट–पित्तशामक, वाजीकर |
| ३ स्फटिक | भोगप्रद, विद्यासिद्धिसाठीं | १० हजारपट–गंडमाला दाबक |
| ४ चांदी<br>५ सुवर्ण | कामना पूर्तीसाठी | चांदी–दशलक्षपट सुवर्ण–शामक–कोटीपट विघ्नाशक–क्षयग्रंथी दाबक |
| ६ हीरक, पाचू इत्यादि | सिद्धी प्राप्तीसाठी–तांत्रिक कामात उपयोगी | रत्नमणि १० हजारपट हृद्रोग शामक पाचक |
| ७ शंख | लक्ष्मी प्राप्त्यर्थ, धर्मसिद्ध्यर्थ | वात नाशक, यकृत् पुष्टिदायक |
| ८ कमळ बीज ( पद्माक्ष ) | सर्व कार्योपयोगी–कृष्णप्रिय | दशलक्षपट वीर्यवर्धक |
| ९ रुद्राक्ष[1] | सर्वसिद्धिप्रद–शंकरप्रिय | अनंत पट रक्तदाबहारक |
| १० तुळशी काष्ठ वा चंदन काष्ठ | विष्णुप्रिय–सर्वकर्मोपयोगी स्त्रिया व शूद्र ह्यांना चालणारी | तुलसी काष्ठ–त्वरित इच्छित देणारे चंदन–शतपट–शामक–क्षुधावर्धक |
| ११ कुशग्रंथी | पापविनाशक | शतकोटी पट–रक्तग्रंथीवर्धक |
| १२ पुत्रजीव मणि | पुत्रपौत्रधान्यसमृद्धिकारक | दशपट वाजीकर |
| १३ हत्तीचे दात | सर्व प्रकारच्या आकर्षण प्रयोगासाठी | अस्थिशक्तिवर्धक |

१. रुद्राक्ष १ ते १४ मुखांपर्यंत असतात त्याचें महत्त्व मुखपरत्वे भिन्न आहे

२. माळामण्यांचे शरीर व आरोग्य ह्यांच्या दृष्टीनें अनेक उपयोग आयुर्वेदात सांगितलेले आहेत

### जपगणना – मंत्रफल पूर्णता

मंत्र फलित होण्याच्या दृष्टीनें म्हणजे मंत्र पुरश्चरणासाठी सामान्य नियम असा – मंत्रात जितकी अक्षरें असतील, तितके लक्ष जप, त्या मंत्राचा करणे जरूर त्यासाठी १०८ मण्याची माला ही जास्त सोईची ठरते पण मंत्रफल पूर्ण होण्यासाठी, मंत्रसिद्ध होण्यासाठी शिवा मंत्र पुरश्चरण पूर्णता म्हणून 'कलौ चतुर्गुणित' इतके लक्ष, तो जप व्हावा लागतो, व मग त्याची सांगता 'सांग हवन' विधीनें करावयाची असते

सारांश, भारतीय कर्मकांड व त्यांतील प्रत्येक कृत्य आधुनिक परिभाषे-प्रमाणें विज्ञानयुक्त तर आहेच पण त्या संकुचित भौतिक विज्ञानापलीकडील अतींद्रियज्ञान पूर्ण आहे, हें सिद्ध होतें ते थोताड नसून अनुभूत व अनुभाव्य असें चिरकाळ टिकाऊ शाश्व होतें, व पुढेंही तसेंच राहील हें खरें.

## पंचम दल

## पूजा मंत्रांतील विज्ञान रहस्यें

### संकल्प व त्याचें स्वरूप

कोणतेंही धर्मकृत्य हा कृतीयुक्त व्यवहार आहे ज्याप्रमाणे व्यवहारातील कृत्य कोणी–कोठें–केव्हा कसें कशासाठी करावयाचें हें प्रथम ठरवून त्याची योजना आखून मग कृती करावयाची असते, तोच नियम, तीच रीत, प्रत्येक धार्मिक कृत्याची असते म्हणून प्रत्येक धार्मिक कर्मकांडाच्या प्रारंभीं संकल्प हा विधि असतो. संकल्प म्हणजे मनानें ठरविलेला निश्चय किंवा प्रतिज्ञा व ती करावयाची कृति ह्या गोष्टी वाणीनें बोलून दाखविणें व तसें करण्याचें ठरलें हें पाणी घेऊन तें ताम्हनांत सोडणें. लौकिक व्यवहारात स्टॅप खरेदी करून त्यावर ठरविलेल्या कार्याची सविस्तर नोंद करून हे मी सुमन-स्थितीत लिहून देत आहे, असें लिहून, दिवस वार लिहून, खाली दस्तूर खुद्द ही सही करावयाची साक्षीदारानी पण आपली सही करावयाची आणि मग त्याची नोंद सरकारदरबारी योग्य मार्गानें रजिस्टर करून त्यावर

सरकारी शिक्का मारावयाचा म्हणजे तो व्यवहार योग्य व बंधक होता. तसा सारखाच प्रकार संकल्पाचा समजावा तो कसा हें पाहू —

कोणत्याही धार्मिक कर्मकांडीय कृत्यामध्यें संकल्प म्हणावा लागतोच त्यात कोणत्या गोष्टीचा उल्लेख कसा केलेला असतो ते पाहू—

( १ ) संकल्पामध्यें कालनिर्देश ( २ ) हेतुनिर्देश ( ३ ) व स्थल निर्देश ह्या गोष्टी नेमक्या अगदी अचूक व ठराविक वेळेपर्यन्त नेमक्या उच्चारावयाच्या असतात जसे कालनिर्देश–श्रीमद्भगवतो * महापुरुषस्य विष्णोराज्ञया प्रवर्तमानस्य, अद्य ब्रह्मणो द्वितीये परार्धे विष्णुपदे, श्री श्वेत-वाराहकल्पे वैवस्वतमन्वंतरे, कलियुगे प्रथम चरणे अष्टाविंशतितमे युगे अमुक नाम संवत्सरे,— अमुक अयने— ऋतौ–मासे पक्षे–तिथौ–अमुक वासरे ( दिवशीं ) अद्य दिवस नक्षत्रे–योगे–करणे–अमुक स्थिते–चंद्रे अमुक स्थिते सूर्ये–शेषेषु ग्रहेषु— एवंगुण विशेषेण विशिष्टायां शुभपुण्यतिथौ— इतका नेमका कालनिर्देश असतो

---

* कालनिर्देशाचा स्थूलार्थ – भगवान् विष्णूच्या आज्ञेनें प्रवृत्त झालेल्या, काळाच्या, आज ब्रह्मदेवाच्या आयुष्यातील द्वितीय भागात, ज्याची मर्यादा पुष्कळ आहे अशा श्वेतवराह नामक ब्रह्मदेवाच्या दिवसात, वैवस्वतमनु या नावाच्या सांकेतिक कालात, कलियुगाच्या प्रथम भागात, अठ्ठाविसाव्या युगात अमक्या संवत्सरात– अमक्या ऋतूत, अमुक महिन्यात, अमुक तिथीस, अमुक वारी, अमुक दिवस नक्षत्री, अमुक राशीवर चंद्र असताना व अमुक राशीवर सूर्य असताना, गुरु अमक्या ठिकाणीं असताना, इतर ग्रह आपापल्या राशीत असताना अशा कालीं इत्यादि हा नेमका काल निर्देश कोणत्या ज्योतिष-शास्त्रीय आधारावर केला ? संकल्पातील संवत्सर–मास ऋतु इत्यादि गोष्टी 'सौर वर्ष गणनेच्या नसून' चांद्र पद्धतीच्याच घ्याव्या ही विशेष सूचना ध्यानात ठेवावी, कारण अलीकडे भारतातही सौरवर्ष ही कालगणना पद्धति नवीनच सुरू झालेली आहे इस्लाम, बौद्ध जैन पारसी यांत वर्ष गणनापद्धति चांद्रच आहे तसेच जगातील स्त्री वर्गाच्या मासिक स्रावाचा चांद्र तिथीशीच संबंध आहे सर्वमान्यच आहे।

( २ ) स्थलनिर्देशः– भरत वर्षे भरत खंडे, जम्बुद्विपे, गोदावर्यां उत्तरे दक्षिण–तीरे. इत्यादि ( नर्मदा व कावेरी व गंगा– ह्या नावाचा उच्चार त्या त्या भारतीय भागात केला जातो )

( ३ ) हेतुनिर्देशः– 'मम आत्मन श्रुतिस्मृतिपुराणोक्त फलप्राप्त्यर्थं, अस्माकं सर्वेशां सहकुटुंबानां सहपरिवारानां क्षेम– स्थैर्य–विजय–अभय– [illegible] आयुरारोग्यैश्वर्याभिवृद्ध्यर्थं द्विपदचतुष्पदसहितानां, शांत्यर्थं, पुष्टयर्थं तुष्टयर्थं सकलमंगलावाप्त्यर्थं...मम इह जन्मनि जन्मजन्मांतरे च...पुत्रपौत्र-धनधान्य–विद्या–जय–यश–समृद्धि...द्वारा महाविष्णु प्रमुख पंचायतन देवता-प्रीत्यर्थं– यथामीलितोपचार द्रव्यैः'– इत्यादि हा संकल्प हेतु किती व्यापक, उदात्त व दूरदर्शी अशा अभ्युदयासाठी केलेला आहे ह्याचा विचार करून मगच हे सर्व थोताड आहे, का ते ठरवा त्यात समाज धारणेचा व्यापक व टिकाऊ पाया घातलेला आहे ह्याचा विचार करावा[1]. वैयक्तिक स्वातंत्र्य घेत असतांना समाज टिकविण्याची किती श्रेष्ठ विचारसरणी, यात आहे ते पहा

( ४ ) देवता नमस्कारः– यातही व्यापक दृष्टि आहे–इष्ट देवताभ्यो नमः । कुलदेवताभ्यो नमः । ग्रामदेवताभ्यो नमः । स्थानदेवताभ्यो० । वास्तु-देवताभ्यो० । आदित्यादिनवग्रहदेवताभ्यो० सर्वेभ्यो देवेभ्यो० । इत्यादि मंत्र म्हणून देवतेला म्हणजे त्याच्या त्याच्या प्रतीकाला नमस्कार करावयाचा.

### पंचदेवताध्यानमध्ये विज्ञान

पूजा संकल्पामध्ये स्पष्ट निर्देश केल्याप्रमाणे स्वार्थ म्हणजे प्रथम व्यापक स्वरूपाचा, केवळ वैयक्तिक संकुचित स्वरूपाचा नव्हे, असा अभ्युदय असून त्याच्या जोडीला त्या अभ्युदयाच्या मदतीने निःश्रेयस प्राप्त करून घ्यावयाचे. ह्या उद्देशाने पंचदेवतांची ध्याने योजिलेली आहेत जसे– गणपतीच्या ध्यानात 'निर्विघ्नं कुरु देव,' देवीच्या ध्यानांत– 'मम वसतु गृहे सर्व-मांगल्ययुक्ता,' हे अभ्युदय प्रधान हेतु आहेत त्याच बरोबर सूर्यध्यानांत[1] 'सवितृमंडलमध्यवर्ति' अशा ठिकाणच्या तेजाचा मालक अशा गौर शक्तीला, विष्णूच्या ध्यानात[2]– विश्वाधारं गगनसदृशं' अनिल विश्वाचा आधार व

१ व २ ह्या टीपा आहेत टाइप पृ पहा ३५ वर

आकाशाप्रमाणे अविनाशी आणि शकाराच्या ध्यानात – ' विश्वाय विश्ववंद्य निखिलभयहर ' असे आवाहन केले आहे

१ सध्योपासनेतील ,गायत्रीच्या ध्यानातही याच ठिकाणच्या तेजाचे ध्यान तेच तेज प्राप्त करून घेण्यासाठीं मागितलेले आहे

२ संकल्पामधील महापुरुषस्य विष्णोराज्ञया प्रवर्तमानस्य विश्वाध-तत्वाच्या वैश्विक शक्तीच्या अभिप्रेत अशा सामर्थ्याशी जुळणारा अर्थ ह्या विष्णूच्या ध्यानात आहे

वैयक्तिक व कौटुंबिक वा संप्रदायिक पद्धतीप्रमाणे ज्या प्रमुख देवतेचे पंचायतन असेल त्याप्रमाणे त्या त्या देवतेला योग्य अशा सूक्ताचा अभिषेक प्रथम करावा ज्या सूक्ताचा अभिषेक करावयाचा असतो, त्या सूक्तामध्यें त्या देवतेच्या विशिष्ट शक्तीचे आवाहन करून त्या पंचायतन पूजेमध्यें एक विशिष्ट शक्तिशाली गट ( *Power House* ) तयार होत असता अशा रीतीने उपासक वा पूजक शक्तिसंपन्न होत असतो पुरुषसूक्त हे कोणत्याहि देवतेच्या स्तुतिपर असल्याने प्रथम पुरुषसूक्त नंतर कोणती इष्ट देवता असेल तिचे सूक्त म्हणून अभिषेक करण्याचा शिष्टसंप्रदाय आहे शेवटी ' मनोदेवा म्हणून अभिषेक पूर्ण होतो

## पुष्पासादनांतील विज्ञान

देवपूजेसाठी लागणारी फुलें व पत्री म्हणजे तुलसी – दुर्वा – शमीपत्रें – बिल्वदले इत्यादि वस्तु आणणे, जमविणे वा मिळविणे म्हणजे पुष्पासादन ( पुष्प + आसादन ) या सदर्भात कांहीं निर्बंध व शास्त्रार्थ सांगितलेले आहेत त्यातही विज्ञान म्हणजे विशेष प्रकारची व्यावहारिक व भौतिक ज्ञानविषयक दृष्टि आहे ती अशी — पूजेकरिता लागणारी फुले स्वतः पूजकाने शुद्ध होऊन म्हणजे स्नानविधी उरकल्यानंतर शुद्ध होऊन स्वतः स्वतःच्या बागेतून'

१ शहरी रहाणीत ही गोष्ट अशक्य म्हणून अपरिहार्यतेमुळें विकत आणणे हे अशास्त्रीय नव्हे

आणणे ती झाडी व नीटनेटकी असतील तेवढी निवडून स्वच्छ करून ठेवणे. या आदेशांत त्या त्या वास्तुभोवती शुद्ध हवा असावी म्हणून त्या बगीचाची निगा दुरुस्ती वा देखभाल यात व्यावहारिक व शुचित्वाची दृष्टि आहे तशी त्यात आरोग्योपयोगी पुष्प व फळे यांचा समावेश असावाच, ही पण विज्ञानी दृष्टि आहे एवढेच नव्हे तर फुले व पत्रपुष्पी मिळविताना कृती कोणती व कशी करावी हा पण सूचना आहेत जसे — पुष्पदायी वृक्ष, झाड किंवा वेल हे पदार्थ मानवाप्रमाणेच जीव व चेतना असलेल्या सजीव वस्तु आहेत म्हणून त्यांना दुःख व त्रास न होईल अशा रीतीने त्यांच्यापासून त्या वस्तु मिळविणे, त्यांची प्रार्थना करून ते पदार्थ मिळवावे अशा आदेशाचे मंत्र आहेत. * उदाहरणार्थ — तुलसी मिळवताना म्हणावयाचा मंत्र — 'तुलस्यमृतजन्मासि, सदा त्वं केशवप्रिये, केशवार्थं चिनोमि त्वां वरदा— भवशोभने, ' त्वदंग संभवे पत्रैः पूजयामि यथा हरिम् तथा कुरु पवित्रांगी कलौमलविनाशिनी ' बिल्व पत्रसंपादनमंत्र— ' त्रिदलं, त्रिदलाकारम् त्रिनेत्रं च त्रयायुधम् त्रिजन्म पापसंहारम् एक बिल्वं शिवार्पणम् — इत्यादि असे काही पुष्पांसंबंधानें पण मंत्र आहेत सारांश, वनस्पती जीवनासंबंधानें फार प्राचीन काळींच किती सूक्ष्म विचाराची माहिती मिळविलेली होती हें सिद्ध होतें. [2] खाद्य व औषधी वनस्पतीसंबंधीही असें अनुभूत ज्ञान होते व

* हे विज्ञान सर जगदीशचंद्र बोस ह्या भारतीय शास्त्रज्ञानें प्रयोगसिद्ध करून दाखवीपर्यंत म्हणजे सुमारे ५० वर्षांपूर्वीपर्यंत नव्हते का ? जड व अचेतन समजल्या जाणाऱ्या खनिज पदार्थांसंबंधाचे सूक्ष्म विज्ञान आम्हा भारतीयांना होते हे ' रसशास्त्रा ' वरून स्पष्ट होते

२ औषधासाठी लागणाऱ्या वनस्पती व त्यांची मुळे वा शिल्पकामासाठी लागणाऱ्या झाडांची लाकडे ह्यासाठी तिथी, वार, नक्षत्र इत्यादि पाहून मगच त्या त्या वेळी त्या वस्तु मिळवाव्या, व विमर्शसारख्या प्रयोगासाठी ठराविक वनस्पतींची पूजा करून, प्रार्थना करूनच, मग त्या वस्तु मिळविल्या तरच त्या ठराविक गुणदायी होतात, अशा अनुभूत शास्त्राज्ञा त्या त्या शास्त्रांत सांगितलेल्या आहेत

त्यामुळें व तेही त्या त्या दर्जावर्जत्व कालावधीपर्यंतच असते. त्याचेंही अनुभूत असे मौतिक विज्ञानपूर्ण असे शास्त्र बनविलेले आहे होमहवनादिकासाठी लागणाऱ्या समिधा, त्याची लाबी, रुंदी इत्यादि गोष्टीचे शास्त्र (सायन्स) आहे इतका सखोल विचार आहे म्हणजे ते विज्ञान आता पावेतो तरी पाश्चिमात्याना प्राप्त झालेले नाही. जें थोडें प्राप्त झालेले आहे, त्याचा उपयोग अजून बाल्यावस्थेंतच आहे असे म्हणावें लागते

## पूजा प्रारंभ, पूर्वाराधन व विज्ञान

पूजाविधानात मुख्य भाग दोन, १ ला पूर्वाराधन व २ रा उत्तराराधन ( महाभिषेकासह ). पूर्वाराधन या विधीमध्यें देवतेला आवाहन करुन देव ताम्हनात काढून आसन देण्यापासून पचामृत स्नान उरकून गधाक्षतपुष्प धूपदीप– पचामृत नैवेद्यार्पण एवढे सर्व विधि येतात महाभिषेकस्नानादि या विधीमध्यें ताम्हनात असलेल्या देवावर म्हणजे पचायतनातील देवावर पुरुषसूक्त किंवा प्रमुख देवता सूक्तानें अभिषेक सपवून ' ओम् देवस्यत्वा सवित ' हा मत्र म्हणून शुद्धोदक देवावर घालून मग स्वच्छ वस्त्राने देव पुसून मूळस्थानात ठेवावयाचे आणि तेथें मग त्याना वस्त्र, गध, फूल, पत्री, धूप, नीराजन, दीप, नैवेद्य, दक्षिणा, महानीराजन, दीपारती, मत्रपुष्प, म्हणून मग प्रार्थना करुन तीर्थग्रहण करणे एवढें झाल्यावर पूजा सपवावयाची असते जर महाभिषेक स्नानविधि करावयाचा नसेल तर देव धुवून पुसून पचायतन पात्रात आपल्या जागीं ठेवून इतर उपचार शेवटपर्यंत करावे म्हणजे पूजाविधी सपला

अशा या पूजामत्रात प्रत्येक ठिकाणी अनेक प्रकारचे विशेष ज्ञान म्हणजे आधुनिक दृष्टीचे विज्ञान भरलेले आहे त्याचा नमुनेवजा अल्पपरिचय करुन घेऊ

( १ ) पूर्वाराधनविधीमध्यें पुरुषसूक्ताचे पहिले सहा मंत्र उपयोगिले जातात ' सहस्त्रशीर्षा पुरुष हा पहिला मत्र म्हणून देवतेला त्या ' प्रतीकात या ' अशी विनती करिताना ' आगच्छ भगवन्देव, स्थाने चात्र स्थिरो भव '

यावर ' पूजा करिष्यामि तावत्त्व सन्निधोभव ' असे म्हणताना मूर्तीच्या वा प्रतीकाच्या हृदयाला वा मध्यभागाला उजव्या हाताच्या आगठ्याने स्पर्श करावयाचा असतो यावेळी स्थिरो भव, धातो भव, सुप्रसन्नो भव, वरदो भव, अभिमुखो भव, असाही आवाहन * मंत्र म्हणतात शब्दोच्चारोद्भूत स्पंदनांत वैश्विक चित्स्फूर्तीला स्पर्शून, ओढून, अपेक्षित ठिकाणीं आणण्याचें सामर्थ्य आहे हें अनुभूत विज्ञानी सत्य आहे. त्यामुळें तें देवताचैतन्य पूजा प्रतीकांत येतेंच. म्हणून तसें समजून तरी पुढील पूजोपचार त्या चैतन्ययुक्त प्रतीकाला करावयाचे असतात. अशा रीतीनें सर्व पूजाविधि पूर्ण केल्यानंतर त्या चैतन्याची आरती मंत्रपुष्प–प्रार्थना करून शेवट पूजा पूर्ण केली जाते–निरोप घेतांना ' गच्छ गच्छ सुरश्रेष्ठ पुनरागमनाय च ' ही विसर्जनाची प्रार्थना करावयाची असते. रोजच्या पूजेंत विसर्जन नाहीं.

( २ ) पंचामृत स्नान – ' पयदधिघृतमधुशर्करा ' हे पचामृतस्नानाचे पाच पदार्थ जीवनशक्तीशी संबधित अशा अवयव व इंद्रियें ह्यांना उत्तम कार्यक्षम ठेवण्याला अतिउपयोगी असून ते पदार्थ ज्या क्रमाने उपयोगावयाचे असतात, त्या क्रमांतही असामान्य शरीरविज्ञानी दृष्टि आहे, हें लक्षणीय आहे सदरहू पदार्थ सूक्ष्म नसांना स्नान किंवा मर्दन योग्य आहेत ही कल्पना जगांतील भारतीय विचारी व्यक्तीशिवाय, अन्य शास्त्रज्ञ व्यक्तींच्या डोक्यांत आता पावेतों आली नाहीं. हें भारतीय विज्ञान आहे.

( ३ ) महाभिषेक स्नानादि विधि व विज्ञान – या विधीत प्रथम मुख्य उपास्यदेवतेचे मूलन ( मंत्र ) म्हणून मग पुरुषसूक्तमंत्र म्हणत पूजा पूर्ण करावयाची अशा रीतीने पुरुषसूक्तरूपी सोळाही मंत्र त्या त्या उपचाराच्या वेळी म्हणून शेवटची मंत्र पुष्पांजलीरूप प्रार्थना म्हटली म्हणजे पूजा-विधि संपतो

---

* आवाहन विधि.– आवाहन म्हणजे बोलावणे, हा विधि सहस्रशीर्षा या मंत्राने करिताना केवळ मानसिक, ध्यानानें इष्ट देवता आपल्या समवेत आली असे मानून तिला बसण्यासाठी आसनादि मंत्रोपचार विधि करावयाचे

( i ) दक्षिणा व विज्ञानः– दक्षिणादानात सोन्याचाच उल्लेख केला जातो त्याबद्दलचा मंत्र 'हिरण्यगर्भस्थ हेमबीज विभावसो' हा आहे. यात हेम हा शब्द सोने या धातूचा वाचक आहे 'हिरण्यगर्भ' हा शब्द ब्रह्माड-वाचक आहे, तथापि सोने हें अग्नीचे बीज असून, ते दिल्यानें मला पुण्य व शांति प्राप्त होते, असा हेतु त्या मंत्रात अपेक्षित आहे. हा त्या मंत्राचा अर्थ पृथ्वीच्या पोटांत म्हणजे मध्यभागात सोनें आहे, हें आधुनिक भूगर्भशास्त्रानीं तर्किलेलें ( अजून तें मत सर्व भूगर्भशास्त्रज्ञ संमत नाहीं. ) सत्यज्ञान प्राचीन भारतीय विचारवंताना होते असे वाटतें. कारण तो पदार्थ बीजरूपानें अग्नीच आहे हे भारतीय शास्त्रज्ञान आधुनिक विज्ञानाला अलीकडे ज्ञात होत आहे– पृथ्वीच्या पोटात जसजसे खाली जावें, तसतसे अग्नीचे म्हणजे उष्णतेचे मान इतके वाढत जातें की, तेथें सोन्याशिवाय इतर कोणताच पदार्थ टिकणेंच अशक्य हा आधुनिक विज्ञानी शोध त्या वेळीं भारतीय उपासकांना माहित होता, असेंच मानणें गैर नाहीं.

(ii) नीरांजन दीपः– 'धूपदीप नैवेद्य समर्पयामि' यातील दीपात सामान्यतः एकच फुलवात किंवा दोन वाती मिळून बनलेली एकच वात असते. पण पूजेच्या शेवटी देवतेचा निरोप घेतावेळच्या नीराजन दीपात अनेक वाती असाव्या त्याला 'पंचारती' असें म्हणतात, पण ह्यातील वातींची संख्या विषमच असावी असा आदेश आहे. त्यांत फार मोठें विज्ञान आहे. आरती

हें खरें. तथापि नित्य पूजेंत पंचामृत स्नानाचे सर्व विधि मंत्र म्हणूनच करावयाचे. पंचामृत स्नान न घालिता शुद्धोदक स्नान घालून सर्व देवताना स्वच्छ पुसून त्या त्या ठिकाणी ठेवून 'त यज्ञ बर्हिषि प्रौक्षन्' हा पुरुषसूक्ताचा ७ वा मंत्र म्हणून वस्त्रापचारादि विधिमंत्र म्हणत सर्व पूजा शेवटपर्यन्त संपवावी. असाहि प्रघात आहे. कुंकू, काजळ, कटगुरु, इत्यादि पदार्थ देवीला त्या त्या ठिकाणी लावावे. त्यातील जो पदार्थ नसेल त्या ऐवजीं, अक्षता अर्पण कराव्या. शालिग्रामरूप विष्णुमूर्तीवर अक्षता घालूं नये हा निषेध शालिग्राम घटित विष्णुमूर्तिसंबंधीच आहे पाषाणादि घटित विष्णुप्रतीकावर अक्षता समर्पणास निषेध नाहीं

मोनाळ्याची संख्याही विषमच आहे. रुद्राध्यायातील अकराव्या चमकातही बहुगण्य मंत्र विषम संख्या वाचकच असे आहेत. या प्रत्येकांत पंचभौतिक शरीर व त्यांतील ज्ञानेंद्रिये व त्यांचे व्यापार ह्यांशी संबंध आहे. भारतीय शिल्पशास्त्राप्रमाणे गृहरचनाप्रकरणात, खिडक्या व त्याचे गज ह्यांची संख्या विषमच असावी, आढे व त्याच्या एखाद खांबाची पूजा करणे, ओसरीला लावावयाचे खांब, महाले ( कुळया ) ह्यांची संख्याही विषमच असावी, असे भारतीय वास्तुशास्त्र आहे. चिनी व जपानी मंदिर शिल्पामध्येंही घ्यावयाच्या आलंबांची ( Fulcrum ) संख्याही विषमच असावी, असें आहे ह्या सर्व विचारसरणींत विषम संख्येचेंच महत्त्व विज्ञानी दृष्टीनें आहे.

( iii ) प्रदक्षिणा व विज्ञान:— गणपति, देवी, सूर्य, शिव किंवा अश्वत्थ ह्यांना घालावयाच्या प्रदक्षिणांची संख्याही अनुक्रमें तीन, एक, सात, अर्धी व सात अशीच विषम आहे यातही अंकशास्त्रीय ( Science of Numerology ) विज्ञान भरलेले आहे फक्त विष्णु देवतेला चार म्हणजे सम संख्या प्रदक्षिणा घालाव्या, असे शास्त्र आहे

( iv ) नमस्कार * व विज्ञान:— देवदेवतांना संतुष्ट करण्यासाठी घालावयाच्या किंवा करावयाच्या नमस्कारांची संख्याही १, ३, ५, ७ अशीच विषम आहे. ह्यातही विज्ञान भरलेले आहे.

---

* नमस्कार:- हस्तांदोलन:— भारतीय पद्धतीप्रमाणे, देवता, पूज्य वा श्रेष्ठ व्यक्ति ह्यांना करावयाचा ' नमस्कार ' दोन हातांनी करावयाचा किंवा देवतेला किंवा गुरुस्थानीय व्यक्तीला करावयाचा नमस्कार साष्टांग किंवा पंचांग ( हात, पाय, मस्तक, वाणी व बुद्धि ही पंचांगें, याच्या जोडीला छाती, दृष्टि व जानु हे धरले की, साष्टांग-अष्टांगासह ) नमस्कार करावा भारतीय नमस्कार पद्धतीमध्ये नम्रता व आदर हे विचार प्रदर्शित होतात तसेच नमस्कारात, प्रश्न विचारण्याइतपत योग्यता असणाऱ्याचा किंवा अरूर तर सेवाभावाची ज्ञानप्राप्तीसाठीं तयारी असल्याचा भाव, प्रदर्शित

सारांश, भारतीय कर्मकांडांतील प्रत्येक कृतींत आधिभौतिक आधिदैविक व अध्यात्मिक दृष्टीचे विशेष म्हणजे असामान्य असें विज्ञान भरलेलें आहे. हे खास पूजाविधींतील, मंत्र कृति, विधान व साहित्य या प्रत्येकांत असेंच उच्च प्रतीचे श्रेष्ठ विज्ञान भरलेलें आहे व तें विज्ञान प्रयोगसिद्ध अनुभूत असेंच आहे. केवळ तार्किक किंवा अनुमानीयच नाहीं. ह्याचा विचार करण्याची जरूरी, वेळ वा संधि आताच आलेली आहे, असें नाही का वाटत ? *

## प्रथमसर – विज्ञान संपूर्ण

---

होतो पण हस्तांदोलनाच्या किंवा तत्सम एकहस्तीय शुभचिंतनीय अशा पाश्चिमात्य पद्धतीत बरोबरीच्या अहंभावी विचाराचा अर्थ अभिप्रेत असतो. आदर वा नम्रता भाव नसतो. इस्लामीयांच्या परस्पर नमस्कारपद्धतीत परस्परांचे दोन्ही हात आपल्या हातात घेऊन वाकून आदरभावी अर्थ असतो. तसाच 'आले कुम् सलाम' किंवा 'आदाब ए अर्ज' ह्यातही आदरभाव व नम्रता अभिप्रेत आहे. नमस्कार, साष्टांग नमस्कार, प्रणाम, दण्डवत इत्यादि शब्द भारतीय नमस्कार पद्धतीसंबंधीं फार खोल विचार दर्शवितात. ब्रह्मदेश, थायलंड, जपान इत्यादि देशाचे प्रतिनिधि राष्ट्रपतीपुढें येताना व अधिकार पत्र सादर करताना नम्रतेने वाकून नमस्कार करितात याचे नाव पूर्वेकडील श्रेष्ठसंस्कारित नमस्कार पद्धति स्थान यरील विशेष दृष्टि आहे

* ग्रंथ– ग्रंथ विस्तार न व्हावा ह्या हेतूनेंच या ठिकाणीं विचारांना अर्ध-विराम किंवा पूर्णविराम देणे मला तरी इष्ट वाटतें.

द्वितीय स्तर – विज्ञानकलिका सूक्तमुकुलें—

# पंचविध शक्तितरंग

अनुक्रम





# सूक्त-परिचय

पूर्वी सांगितल्याप्रमाणे पंचायतनपूजेतील देव-देवतासंबधाने म्हणजे त्यांच्यामधील गुण, सामर्थ्य व भक्तिप्रवाह इत्यादि गोष्टींचे वर्णन करणारे विचारपरिप्लुत असे मंत्र असून त्या मंत्रांच्या द्वारा त्या त्या देव-देवतांना आवाहन करून उपासक किंवा पूजक आपल्या मनत्वाप्रमाणे फल देण्याची प्रार्थना करीत असतो

पूजापरिचयामध्यें सांगितलें आहेच की, देवपूजा ही अभ्युदय व निःश्रेयस हे दोनही हेतू साध्य करण्यासाठीं आहे हे हेतू सत्वर म्हणजे उपासकाच्या कुवतीप्रमाणे-लायकीप्रमाणे व सामर्थ्या प्रमाणे-योग्य अशा कालावधीत पूर्ण व्हावे, म्हणून विशेष प्रकारच्या तंत्राप्रमाणे त्या मंत्राची पुरश्चरणें व तत्सांगतापूर्णत्वासाठी होमहवन-अन्नसंतर्पणादि क्रिया कराव्या. हा दुसरा एक उपयोग असा सूक्ताचा केला जातो एवढेंच नव्हे तर त्या सूक्तांतील ठराविक मंत्रांचा उपयोग, त्याचें पुरश्चरण ठराविक पद्धतीने करून, अनेक प्रकारच्या अभ्युदयी गोष्टीही प्राप्त करून घेतां येतात इतक्या व अशा योग्यतेची हीं सूक्तें असल्याने त्यांचा येथें अतिस्थूल परिचय करून देण्याचा प्रयत्न आहे ही सर्व सूक्तें 'वेदोक्त' आहेत 'वेदोक्त' असे मुद्दाम सांगण्याचा

हेतू असा की, ती म्हणण्याचा अधिकार स्त्रीवर्गाला नाही. असे का ? तर त्याच्यामागें मोठें विज्ञान आहे. ते असें— वेदोक्त सूक्तामध्यें ॐकार असतो. तो ॐकार सूक्तागणिक उच्चारणे आवश्यक आहे. ॐकाराचा उच्चार करण्याच्या क्रियेशी स्त्रीवर्गाचा गर्भाशय व मासिकदोष ह्याचा घनिष्ट संबंध आहे आयुर्वेदात त्या स्पंदनाचे परिणाम कसे होतात, हे उल्लेखिलेले आहे 'कलत्र' हा नपुंसकलिंगी शब्द स्त्रीला कोणत्या वयात, कां लाविला जातो आणि कान्ता, भार्या, जाया, वनिता इत्यादि शब्द केव्हा व कां लाविले जातात, ह्याचा आणि ॐकारयुक्त वेदमंत्राचा घनिष्ट संबंध आहे. हे विसरू नये

पूजेंतील महाभिषेकसमयी प्रथम आपल्या मुख्य देवतेचे सूक्त म्हणून मगच पुरुषसूक्ताने अभिषेक सपवावा.

## सर्वसूक्त-समन्वय

पंचायतन देवपूजेंतील सर्व मन्त्रामध्यें केवळ उपासक व पूजक यांची वैयक्तिक उन्नति होऊन सुखसमाधान मिळावे हा एकच हेतू नाही. पूजक हा त्याच्या समाजाचा एक घटक असून त्याचा समाजही उन्नत व्हावा आणि अखेरीस सर्व मानवसमाजही अशा उन्नतीस जावा की त्यामुळें 'सर्वेऽत्र सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः' अशी अवस्था सर्वमानवसमाजरूपी समष्टिपुरुषांत दिसावी.

'न क्रोधो न च मात्सर्यं न लोभो नाशुभा मतिः' ही स्थिति म्हणजेच 'कृण्वन्तु विश्वमार्यम्' हा भारतीय कर्मकाण्डीय कृतीचा कौस्तुभमणी आहे. असे अनुभवास येईल अशा विचारानी ओतप्रोत भरलेली सर्व सूक्तें आहेत. म्हणून त्या प्रत्येकाचा, त्यातील विचाराचा, स्थूल परिचय करून देण्यांत येत आहे

# गणपत्यथर्वशीर्ष-परिचय

## कलियुगांतील त्वरित फलदायी देवता-
## साधना परिचय

### विख्यात वैदिक देवता



' गणाधीश जो ईश सर्वां गुणांचा । मुळारंभ आरंभ जो निर्गुणाचा ' इत्यादि. विश्वांत प्रथमतः म्हणजे प्रारंभी जे स्फुरण झालें, व स्पंदन झालें, जो आवाज उत्पन्न झाला, जो शब्द ऐकू आला, तो ' ॐ ' असा सामष्ट उच्चार सर्व

विश्वभर पसरला या दीर्घ उच्चारामध्यें 'अ—उ—म्' असा उच्चारध्वनीहोतो. हा 'ॐ' (ओङ्कार) कार हे गणेशदेवतेचे प्रतीक आहे यामुळें गणपती ऊर्फ गणेश ही विश्वातील आद्य म्हणजे आरंभाची देवता आहे, असे समजले जातें. सर्व वैदिकमंत्र ॐकार प्रारंभित आहेत अर्थात् गणपती ही वैदिक देवता आहे. ह्या देवतेसंबंधाचे मंत्र म्हणजे सूक्ते मुख्यत अथर्ववेदातील आहेत

## गणपती ही जगन्मान्य विद्यादेवता

हिंदूधर्माप्रमाणे कोणत्याही नित्य वा नैमित्तिक धर्मकार्यामध्यें गणपति—पूजन हे केलेच जाते भूमिपूजनासारख्या कार्यातही प्रारंभी गणपति—पूजन—विधि असतो बौद्ध वा जैनधर्मीयामध्येंही विघ्नहर्ता वा निर्विघ्नकर्ता देवताप्रतीकाची पूजा केली जाते, तथापि गणपती ही विद्यादाश्री व विद्या प्रचोदक अशी देवता आहे ह्या दृष्टीने त्याची पूजा, उपासना किंवा प्रार्थना केली जाते जसे भारतातील सर्व यती, संत किंवा सज्जन ह्यानी जें जे लिखाण केले, त्या प्रत्येकात सरस्वती म्हणजे विद्यादेवता व तीही गणपतीची पत्नी या दृष्टीने व भावनेने गणपतीची प्रार्थना व स्तुतीच करून आपल्या ज्ञानकार्यांत सरस्वतीची प्रार्थनाच केली आहे, हे सर्व सत्पुरुषाच्या लिखाणा-वरून स्पष्ट होत भारतातील प्रत्येक भाविक आपल्या मुलाना शिकविल्या जाणाऱ्या विद्येचा प्रारंभ 'श्री गणेशायनम ' असा करतो किंवा त्याला अशा आशयाचे शब्द प्रथम शिरविले जातात [1] भारतातील सर्व भाषात प्रारंभीचे अक्षर 'अ' कारच असत युरोपातील सर्व भाषातील प्रारंभींचा वर्ण 'A' 'Alfa' असाच आहे इस्लामी धर्मीयाच्या अरेबिक लिपीमध्यें पहिला

१ अलीकड भारतीय शिक्षणक्षेत्रात मुलाच्या शिक्षणाचा प्रारंभ 'ग, म, भ, न' या अर्थ नसलेल्या वर्णाक्षरानीच केला जातो ! तथापि त्यातील 'ग' हा गणेशाचे द्योतक या प्रतीक आहे गध्याचा 'ग' असे शिकविले जात नाही, एवढें तरी शुभचिन्हच !

वर्ण अकारात्म 'अलीफ' हाच आहे. मध्यआफ्रिकेतील बहुतेक भाषातील लिपिगत झालेल्या स्वाहिलीगटाच्या भाषात प्रारंभाक्षर 'अ' [ या 'अ' वर कमीजास्त जोर देऊन उच्चार केला तर मात्र शब्दाच्या अर्थात बदल होता ] आहे. चिनी जपानी चित्रलिपीत प्रथमाक्षर म्हणजे चित्रद्योतक शब्दाचा प्रारंभ, त्याचप्रमाणे सख्यागणनेच्या एक ( १ ) या सख्येचा उच्चार 'अ' वा 'इ' सदृश होतो. ( जसे – 'इचि नी–सान्' इत्यादि संख्या गणना ) सारांश, मानवी उच्चार यंत्रातून निघणाऱ्या आवाजातही 'अ' सदृश उच्चारालाच प्राधान्य दिले जाते. ॐकाररूप गणपतीच्या या सर्व व्यवहार–सफलतेमुळेच मेक्सिको, पेरू ( इंका संस्कृतीच्या भागात ), तुर्कस्थान, मध्यएशियाचा दक्षिणभाग, जावा, सुमात्रा, फिलिपाइन्स इत्यादि भागात गणपतीच्या मूर्ती सापडल्या आहेत. त्यावरून मुख्य पाचखंडात गणपतीची उपासना प्रसृत झालेली होती, हे दिसते. तसेच या गोष्टींवरून गणपतीदेवतेच्या जगन्मान्यत्वाची व जगदाधरत्वाची स्पष्ट कल्पना येते. गाणपत्य सांप्रदायाचा हा केवढा विजय होता हे ध्यानांत येईल.

चारही युगांतील गणपतीचे अवतार व स्वरूप– श्री गणेशाने चारही युगात धर्मरक्षण व भूभारहरण या कार्यासाठी निरनिराळे अवतार घेऊन ती कार्ये केली असे वर्णन गणेशपुराणात आहे. त्याचे ते अवतार व त्याचे रूप ह्या गोष्टी पुढे दिल्याप्रमाणे होण्या व होणार असे वर्णन गणेश पुराणात आहे

[ गणेशपुराण अध्याय १३० मध्ये ]

| युग | नाव | वाहन | वर्ण | हस्त |
|---|---|---|---|---|
| १ कृत | विनायक | सिंह | तेजस्वी | १० दशभुज |
| २ त्रेता | मयूरेश्वर | मयूर | शुक्ल | ६ षड्भुज |
| ३ द्वापर | गजानन | मूषक | रक्त | ४ चतुर्भुज ( सध्याची ध्येयमूर्ती ) |
| ४ कलि | धूम्रकेतु | ० | धूम्र | २ द्विभुज ( पुढे अवतीर्ण होणारी ) |

## कलौ चण्डीविनायकौ

याचा अर्थ, कलियुगामध्यें इष्टकामना सिद्ध होण्यासाठी म्हणजे पूर्ण होण्यासाठी देवी व विनायक हीं दोनच दैवतें हमखास व त्वरित फलदायी होतात, असा आहे आरतीमध्येंही 'गणपति शिव हरि भास्कर अम्बा सुखमूर्ती' असा उल्लेख आहे म्हणजे गणपती ( ॐ आदिब्रह्म ) व अम्बा ( आदिशक्ती ) ह्यांच्या संपुटामध्यें इतर देवता ठेविल्या आहेत पंच देवोपासनेची देवतापंचायतनातील ही अशी मांडणी आहे अखिल भारतामध्यें गणपती व देवी यांचीं देवालयें व उपासक ह्यांची संख्या सर्वांत जास्त आहे. ह्या दोन्ही देवतांची उपासना, मंत्र, तंत्र व यंत्र ह्यांच्या उत्कृष्ट समन्वयानें केली जाते यामुळें या देवतांची सिद्ध, स्वयंभू व जागृत अशी अनेक स्थानें भारतात आहेत[1]

## गणपति अथर्वशीर्ष

'अथर्वशीर्ष' नावाच्या सूक्ताचे ( १ ) प्रारंभीचे शांतिमंत्र जसे, ॐ भद्रं कर्णेभि . बृहस्पतिर्दधातु' म्हणून मग ( २ ) 'ॐ नमस्ते गणपतये' पासून 'शिवसुताय श्रीवरदमूर्तये नम ' पर्यंत दहा मंत्र आणि (३) फलश्रुति– 'एतदथर्वशीर्षं' पासून 'य एवं वेद' पर्यंत ४ मन्त्र असे तीन भाग आहेत. फलश्रुतीच्या शेवटी पुन शांतिमंत्र म्हणावेच प्रसिद्ध झालेल्या अथर्वशीर्षा-च्या म्हणजे मूळ सूक्तात पाठभेद वा अपपाठ आहेत पण येथें दिलेल्या त्या भागात दिलेले मंत्र सर्व शुद्ध म्हणजे अपपाठ, प्रपाठ किंवा पाठभेद ह्या सर्वांचा शास्त्रीय व अर्थलक्षी विचार करूनच दिलेले आहेत.

---

१ ह्या देवतांच्या सर्वप्रकारच्या उपासनेची माहिती 'मंत्रशास्त्र,' नवज्योतिप्रकाशन, कालिज गल्ली, दादर–मुंबई २८ ) १९७० ची आवृत्ति यांत पहावी किंवा 'गणेशकोश –१९६८, व्होरा आणि कं, काळबादेवी, मुंबई–२ यांत पहावी

साधारण संस्कृत येणारालाही त्या मंत्राचा अर्थ सहज समजण्याजोगा आहे त्यावरून 'गणपति' म्हणजे 'सर्व काही' अथवा 'काय नाही ?' असे दर्शविले आहे त्यामध्ये 'ॐ ग गणपतये नम' हा गणपतीचा मूळ उपासनेचा सबीज मंत्र असून 'नमो व्रातपतये' पासून 'वरदमूर्तये नम' पर्यंत ही, अष्टविनायकाची आठ नावे आहेत

## एकादशिनी व चतुर्थी

गणपतीची एकादशिनी 'अथर्वशीर्ष' ही सूक्ते एकवीस वेळा म्हणण्याने होते, ती अशी— प्रथम एकदाच शांतिमंत्र म्हणणे, नंतर 'ॐ नमस्ते गणपतये' पासून 'वरदमूर्तये नम' पर्यंतचा भाग एकवीस वेळा म्हणणे आणि नंतर फलादेश म्हणून प्रारंभीचा शांतिमंत्र म्हणणे असे केल्याने गणपतीची एकादशिनी पूर्ण होते

प्रत्येक महिन्यातील चतुर्थी हा गणपतीच्या उपासनेचा महत्त्वाचा दिवस समजला जातो. प्रत्येक महिन्याच्या प्रत्येक चतुर्थीला निरनिराळी नावे आहेत त्यापैकी भाद्रपद शुद्ध चतुर्थी ( गणेशचतुर्थी ) हिला 'वरद' असे नाव असून, माघ शुद्ध चतुर्थीला 'मंगला' असे नाव आहे ह्या दोन चतुर्थ्या महत्त्वाच्या मानिल्या जातात

अथर्वशीर्ष म्हणजे काय ? — अथर्व व शीर्ष हे दोन शब्द आहेत 'थर्व' या धातूचा अर्थ 'चचल होणे' अ म्हणजे नाही म्हणजे चचलता नमणे वा नाश करणे यावरून 'अथर्व' म्हणजे शांतता, स्थिरता शीर्ष म्हणजे डोके. मनाची चचलता नाहीशी करून डोके शांत करण्याची विद्या म्हणजे अथर्वशीर्ष. रक्तदाबाच्या व्यक्तीला या सूक्तपाठाचा चांगला उपयोग होतो, असा अनुभव आहे अथर्ववेद हा एक वेद आहे त्यात ब्रह्मविद्या, आत्मविद्या व अध्यात्मविद्या हे मुख्य विषय आहेत

गणपतीचे अथर्वशीर्ष :— देवी, शंकर, नारायण इत्यादि देवतांची अशीच अथर्वशीर्षे आहेत याचा अर्थ त्या त्या देवतेच्या मदतीने म्हणजे उपासनेने शांतता, वा स्थिर चित्तता प्राप्त करणे हा आहे

गणपतीचे म्हणजे 'गणाना पतीचे, स्तवन करून' उपासना करून व्यक्तीच्या मनाची, त्याचप्रमाणें समाजरूपी गणांची स्थिरता, शांतता व एकध्येयी एकरूपता प्राप्त करावी आणि अशा रीतिनें एकंदर विश्वांतही शांतता नांदावी हा मुख्य हेतु व गणपति अथर्वशीर्षाचा आहे. 'सहनाववतु, सहनौ भुनक्तु, सह वीर्यं करवावहै, तेजस्विनावधी मस्तु मातविद्विषावहै' हा समष्टि धोरणेचा शांतिमंत्रही गणपतीअथर्वशीर्षाच्या अखेरीस म्हणण्याचा परिपाठ आहे पण हे ध्येय साधण्यासाठी 'भद्र कर्णेभि. शृणुयाम देवा' कानानी चागले तेवढेंच ऐकावे, चागले तेवढेंच डोळ्यानी पहावे, सुदृढ अवयवी होऊन सरक्षणक्षम व्हावे व त्यामुळें अनेक वैयक्तिक व सामुदायिक गोष्टी प्राप्त करून घ्याव्या, अशा श्रेष्ठ आशयाचे शांतिमंत्रही म्हणणे जरूर आहे सार्वजनिक गणेशोत्सव करण्याच्या मागें वरील हेतु साध्य करणे ही दृष्टि आहे याचा विपर्यास करून दुरुपयोग न करणे हें ध्यानात घेऊन वागणें हें सर्वांचे कर्तव्य आहे

# पुरुषसूक्त परिचय

**जागतिक धारणेचे मार्गदर्शक व सर्वदेवपूजोपयोगी असे मंत्र**

**श्री विष्णु प्रमुख पंचायतन**



**वेदोक्तवाङ्मयांतीलस्थान**

'पुरुषसूक्त' हा विषय चारही वेद, संहिता, ब्राह्मणे, आरण्यके, सूत्रे ( श्रौत–आश्वलायन–कात्यायन इत्यादि ) व उपनिषदे ( श्वेताश्वतर–माण्डुक्य इत्यादि ) शिवद्रुना, मत्स्यपुराण, ब्रह्मपुराण, भागवत यातही

निरनिराळ्या शब्दांनी आलेला आहे. गीतेतील अकराव्या अध्यायांतही तसेंच वर्णन आहे वेदवाङ्मयांतही हीं पुरुषसूक्तें कोठें त्रोटक तर कोठें विस्तृत असून मंत्रक्रम व पाठभेद यांत सारखेपण नाहीं अशी वस्तुस्थिति आहे तरी त्यांतील विषय व कल्पना ह्या गोष्टी मात्र सर्व ठिकाणीं सारख्याच आहेत. हें पुरुषसूक्त नारायण नावाच्या ऋषीचें आहे

## पुरुषसूक्तसंख्या

पुरुषसूक्ताची संख्या निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळी आहे ती अशी–

| | | |
|---|---|---|
| ( १ ) | ऋग्वेदीय पुरुषसूक्ते | १६ |
| ( २ ) | वाजसनेय–यजुर्वेदीय ( माध्वयजु० ) | २२ |
| ( ३ ) | सामवेदीय | ७ |
| ( ४ ) | अथर्ववेदीय | १६ |
| ( ५ ) | तैत्तिरीय आरण्यकें ( कृष्णयजुर्वेदीय ) | १८ |

## पुरुषसूक्तांतील ज्ञान-विज्ञान

'पुरुषसूक्त' या शब्दाचा अर्थ पुरुषासंबधाचे उत्तम विचार ( पुरुष – पुरी+वस्, पुर्+उष्, सूक्त–सु+उक्त– सृष्टिरूपी पुरीमध्यें राहणाऱ्या सबधाचीं चांगली वचनें किंवा ज्ञान) या ठिकाणी पुरी–वस् म्हणजे 'सृष्टिरूपी पुरीमध्यें राहणारा ' असा अर्थ आहे यांतील 'सृष्टि ' शब्दाचा अर्थ इंग्रजी-मधील Nature- निसर्ग ( सृष्टि ) असा संकुचित नसून उत्पन्न केलेले अखिल 'विश्व ' असा व्यापक अर्थ आहे असा व्यापक अर्थ का घ्यावयाचा ? तर त्यात ज्ञाताज्ञात असे जें 'विश्व ' आहे, तें म्हणजे 'तो पुरुष ' असें स्पष्ट शब्दांनी त्याचें वर्णन आहे वेदांतील पुरुषसूक्तांतील पहिला श्लोक म्हणजे सूक्त 'सहस्रशीर्षा पुरुष... दशाङ्गुलम् ' हा आहे इतरत्रही त्या पुरुषाचें वर्णन 'सहस्र अनन्त ' इत्यादि शब्दांनीच केलेलें आहे म्हणून सहस्र या शब्दाचा अर्थ 'हजार ' असा नसून लक्षणार्थाने हजारो अथवा अनंत असाच त्यांतील वर्णनावरून घ्यावा लागतो 'विश्वव्यापुनि अवघा तो परमात्मा दशांगुळें उरला असें वर्णन आहे

## ब्रह्माण्डीय पुरुषाचें स्वरूप

ज्याला आपण सामान्यत: ' विश्व ' असे समजतो, तें ब्रह्माण्डाचाच एक भाग आहे ( ' पादोऽस्य विश्वाभूतानि ' ) ' त्रिपादस्यामृत दिवि ' विश्वरूपी एका भागाशिवाय ब्रह्माण्डाचा जो उर्वरित भाग आहे, तो अविकृतच आहे नाश-विनाश, उत्पत्ति, स्थिति, लय इत्यादि घटना त्या अविकृत अशा उर्वरित भागामध्ये होत नसून ब्रह्माण्डभागामध्येच होतात ह्याच अर्थानें ' त्रिपाद् उर्ध्वम् उदैत् पुरुष. ' पादोऽस्येहाभवत्पुन ' असे म्हटलें आहे. पृथ्वीरूपी भागावर जशा उत्पत्ति, स्थिति व लय ह्या घटना घडतात, तशा तारका विश्वातही अशा घटना घडतात व घडत आल्या आहेत. नवीन सूर्य, नवीन चंद्र, नवीन तारका इत्यादि उत्पन्न होतात व नष्टही होतात. असे हे सत्र अनंतकालापासून चालूच आहे. पण पृथ्वीवरील चिमुकल्या दृष्टीच्या चिमुकल्या मनुष्यरूप जीवाला उत्पत्तिस्थितिलयविषयक नवीन शोधाचा केवढा खुळा अभिमान वाटत असतो याचा आम्हा ' पुरुषसूक्त ' रचयित्याच्या वगजाना विचार नको का करायला ?

ह्या सर्व घटनारूप व्यवहार नित्य नियमितपणे, निपरवादरीतीनें चालत असतो हें काम कोण करतो वा करविता ? त्या ब्रह्माण्डाचा तव अधीश आहे त्या ब्रह्माण्डाधीशालाच ' परमात्मा ' म्हणजेच रामदासाचा ' थोरला देव ' असे म्हणतात त्या परमात्म्यापासून ' तस्मात् विराडजायत । विराजो अधिपूरुष ' हा ' अधिपुरुष ' परमात्म्यापासून उत्पन्न झालेल्या ' विश्व-पुरुषा ' चा अधिष्ठाता आहे या अधिपुरुषाच्या नियंत्रणामुळें तो विश्व-पुरुष सजीवसा झाला.

### परमात्मा-पुरुष व प्रकृति

' एकोऽहं बहुस्याम् ' ह्या ब्रह्माण्डपुरुषाच्या इच्छेमुळें पुरुष व प्रकृति असे दोन घटक, अशी दोन रूपे उत्पन्न झाली ' प्रकृति ' ह्याचा अर्थ विविध प्रकारची कृती करणारी जी शक्ती ती. तिलाच ' माया असे म्हणतात

+

'माया' म्हणजे कौशल्य किंवा कार्यकुशलता. या कार्यकौशल्यामुळेंच 'सृष्टी' उत्पन्न झाली. 'मा–या' या शब्दाचा दुसरा वेदान्ती अर्थ– मा म्हणजे 'नाही' 'नास्तित्व' व 'या' म्हणजे भासमान अस्तित्व, असा समजला जातो. पण येथें तो वेदान्ती अर्थ घ्यावयाचा नाहीं. आतां पुरुषसूक्तातील 'विश्व-पुरुषा'चे स्वरूप पाहू.

## विश्वपुरुषाचें त्रिविधस्वरूप




पुरुषसूक्तामध्यें या विश्वपुरुषाचे वर्णन विराट् पुरुष, अखिलमानवसमाज-रूपी समष्टिपुरुष, किंवा राष्ट्रपुरुष, आणि व्यष्टिपुरुष ( व्यक्ति पुरुष ) असे तीन प्रकारचें आहे. असा हा 'पुरुष' एवढा त्रिस्वरूपीच नसून त्याच्या पलीकडे आहे. 'अत्यतिष्ठत् दशांगुलम्' किंवा भगवद्गीतेंत सांगितल्या-प्रमाणे 'मयि ते न तेष्वहम्' असा अति व्यापक आहे. पण तो वर वर्णिलेल्या ब्रह्मपुरुषाचा म्हणजे परमात्म्याचा एक भाग आहे.

## विश्वपुरुषाचें स्वरूप

'मुख किमस्य ? कौ बाहू ? का ऊरू, पादा उच्येते ?' या विश्वपुरुषाच्या सबंधाच्या प्रश्नाची उत्तरे म्हणजे सूक्तें १२, १३ व १४ म्हणजे 'ब्राह्मणोऽस्य मुखमासीत्' पासून 'पद्भ्यां भूमिर्दिशः श्रोत्रात् तथा लोकाँ अकल्पयन्' येथपर्यंत आहेत ती अत्यंत विचारणीय आहेत या विश्वपुरुषाचा देह द्युलोकापासून पृथ्वीपर्यंत पसरलेला आहे. आणि तो या विश्वाचें संचालन, त्यातील घटकांच्या सहकार्याने करीत आहे जसे, सूर्य प्रकाश देतो, चंद्रमा मनःस्वास्थ्य ठेवितो, पर्जन्य धान्यादि उत्पन्न करतो, वायु जीवन देतो, पृथ्वी सर्वांना आधार देते सारांश, अशा त्या विराट् विश्वपुरुषाचें हें मस्तक आहे, अंतरिक्ष हे पोट आहे आणि पृथ्वी ही त्याच्या पायाच्या स्थानी आहे असा विराट् विश्वपुरुष हा आधिदैविक आहे, तो संपूर्ण ब्रह्माण्डात व्याप्त आहे

### मानवरूप समष्टिपुरुषाचें स्वरूप

'सहस्रशीर्षा पुरुष सहस्राक्ष सहस्रपात्

स भूमिं विश्वतो वृत्वात्यतिष्ठद् दशाङ्गुलम्' ॥ १ ॥

पृथ्वीवरील सर्वमानवसमाज हा सहस्रशीर्षा असा समष्टिपुरुष आहे यालाच मानवसमाजरूपी राष्ट्रपुरुष म्हटले आहे व्यक्तीच्या शरीराचे सर्व अवयव, जरी ते निरनिराळे व भिन्न ठिकाणी, भिन्न स्वरूपात आहेत तथापि जसे ते सहकार्यानेंच कार्य करून शरीर सुस्थित व कार्यक्षम ठेवितात, त्याच-प्रमाणें सर्व मानवसमाजानें परस्पर सहकार्य करावें व तें केलें तरच तो 'राष्ट्रपुरुष' चिरंतन निरामय स्थितींत राहील. मानवरूपी जीव तेवढा सर्वत्र सारखाच, त्याचें हिताहित, त्याचे इष्ट सर्व सारखेच या विचारानें, भावनेने व आचारानें सर्व मानव वागतील तरच पृथ्वीवरील मानवसमाज सुखी राहील, अशी शिकवण व विचारधारा याच पुरुषसूक्तात आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर 'One world' 'सर्व जग तेवढें एक' ह्या भावनेची जी लाट उठली ( पण ती स्थिरावली मात्र नाही, कारण त्या विचाराला सर्वांचे

सहकार्य नव्हते ) तीच पुरुषसूक्तीय विचारधारेसारखी नाही का ? हाच तो समष्टिरूप राष्ट्रपुरुष म्हणजेच आधिभौतिक राष्ट्रपुरुष होय. तो पृथ्वीवरील सर्व भूभागात व्याप्त आहे ज्ञानी हे या राष्ट्रपुरुषाचे मस्तक आहे, शूर वीर हे बाहू आहेत, वृषक् पोट आहेत, आणि कर्मचारी पाय आहेत, म्हणजेच शरीराचा आधार किंवा पाया आहेत. 'ब्राह्मणोऽस्य मुखमासीत् बाहू राजन्य कृत । ऊरू तदस्य यद् वैश्य पद्भ्या शूद्रो अजायत ' हे वर्णन त्या मानवसमाजरूपी समष्टिपुरुषाचे म्हणजे राष्ट्रपुरुषाचे आहे त्या प्रत्येकाने आपापले काम केवळ मानवसमाजरूपी, राष्ट्रपुरुषासाठीच–स्वत साठी नव्हे–केले तरच तो समष्टिराष्ट्रपुरुष सुखी, समाधानी व सुस्थित नाही का दिसणार ? आधुनिक 'युनो ' ( Uno ) ही संस्था त्या दृष्टीने काम करित आहे का ? काहीही असो, तथापि 'युनो ' ही संस्था तरी त्या ध्येयासाठी असावीच, या विचारधारेपर्यंत आजचा मानवसमाज आला आहे, हे एका दृष्टीने पुरुषसूक्तीय सुलक्षणच आहे.

## व्यष्टि पुरुषाचे स्वरूप

हा पुरुष वैयक्तिक शरीररूपी 'पुरी ' मध्ये राहतो म्हणजे तो शरीर निवासी आहे तो जसा स्त्रीच्या शरीरात आहे, तसाच पुरुषशरीरातही आहे या व्यक्तिपुरुषाचे ज्ञान वत्याची खडान्खडा माहिती प्रत्येक व्यक्तीला अवश्य असली पाहिजे याची कारणे तीन ती अशी– ( १ ) या शरीररूपी नगरीत राहणारा 'मी ' म्हणजे कोण ? या शरीरामध्ये कोणत्या शक्ति कोठें आहेत ? त्या शक्तीचा 'मी ' शी काय संबंध आहे ? आणि त्या शरीरातील 'मी ' त्या शक्तीचा उपयोग करतो का नाही ? तो उपयोग कशाकरिता करितो ? ही माहिती हवी ( २ ) दुसरें कारण – ज्या अर्थी अशीच असंख्य शरीरे पृथ्वीवर आहेत त्या अर्थी त्याचा व ' माझा ' कोणता संबंध, कसा व कशाकरिता आहे ? हे ज्ञान हवे ( ३ ) तिसरें कारण :– शरीरे जरी भिन्न असलीं तरी त्यातील 'मी ' हाच प्रत्येक शरीराचा ' अधिष्ठाता ' आहे, हें ज्या अर्थी खरे आहे, त्या अर्थी वैयक्तिक 'मी ' म्हणजेच मानवसमाज

स्त्री समष्टि मी हे दोन एकच आहेत, अभिन्न आहेत आणि अशी वस्तुस्थिति मी समजलो, उमजलों, अनुभविली तर विराट्पुरुष म्हणजेच विश्व पुरुष, *त्यातहि ' मी ' आहेंच म्हणजे विश्वपुरुषाचा वैयक्तिक ' मी ' हा* एक भाग किंवा अंश आहे हें ज्ञान झालें म्हणजे शरीरराउळातील ' मी ' ला ' पिंडी ते ब्रह्मांडीं ' हें कसे, ते पटेल, उमजेल व अनुभविता येईल अशा रीतीनें व्यक्तिपुरुषाचे ज्ञान व वर्णन हे आध्यात्मिक आहे ' देह हें राउळ आत्मा हा विठ्ठल ' तुकारामाचे ज्ञान ते हे

[ व्यक्तिरूपशरीरातील देवदेवता ]



**' चन्द्रमा मनसो जातश्चक्षोः सूर्यो अजायत ।**
**मुखात् इन्द्रश्चाग्निश्च प्राणात् वायुरजायत ॥**
**नाभ्या आसीत् अन्तरिक्ष शीर्ष्णो द्यौः समवर्तत ' ॥ १ ॥**

इत्यादि वर्णनावरून खालील गोष्टी स्पष्ट होतात—

१) चंद्रमा मन होऊन हृदयात राहतो.
२) सूर्य डोळे होऊन नेत्रस्थानी राहतो
३) अग्नि वाणीच्या रूपाने मुखात राहतो, व शरीरात वावरतो जागृत असतो
४) वायू प्राण होऊन नासिकेत संचार करू लागला
५) दिशा कान होऊन श्रवणेंद्रियात राहतात.
६) अपान नाभिस्थानीं राहतो. इत्यादि

प्रथम चंद्र व मग सूर्यवर्णन असे का ? श्रीसूक्त ... ा व १४ व्या मंत्रातही असाच क्रम आहे ( प्रथम चंद्र व मग सू ...
अशा रीतीनें पुरुषसूक्तात तीनही पुरुषाचे समन्व ... ने दिसेल.

## पुरुषसूक्तांतील इतर विचार

या शिवाय ' तस्मात् यज्ञात् ..... यजुस्तस्मात् ... सूक्ताने वेद व त्याचे प्रकटीकरण, यज्ञामुळें कसे झाले, ' ... विधा. . ग्रीष्म इदम शरद्धविः ' या सूक्तानें यज्ञीय जीवन कसे ... ? त्या यज्ञापासून काय लाभ होतो ? तसेच ' तस्मात् यज्ञात्... ... म्या-श्च य ' ह्या सूक्तानें आणि ' सप्तास्यान्... अवघ्न पु ... ) ह्या सूक्तानें यज्ञचक्राचे परिवर्तन कसे होते ते सांगितले आहे. ... सूक्तातील ' पशु ' म्हणजे ' पहाणारा ' — ' पश्यति इति पशु ' असा अर्थ आहे स्थूल-शरीर, वासनात्मशरीर, बहिर्मानसशरीर, अन्तर्मानसशरीर, बुद्धि, परबुद्धि व जीव या सात त्या पशूच्या म्हणजे पहाणाऱ्याच्या मर्यादा आहेत मनुष्याच्या कायाच्या याच मर्यादा आहेत देवांनी जो यज्ञ मांडून प्रगट केला आहे ( ' देवा यत् यज्ञं तन्वाना ' ) तो यज्ञ त्या शरीरस्थ देवता, मानवी शरीरातील एकवीस समीधांनी पूर्ण करवून घेतात ( त्रि सप्त समिध

कृत. ) त्या २१ समिधा अशा—दोन डोळे, दोन नाकपुड्या, दोन कान, एक वाक् ही सात ज्ञानेंद्रिय, दोन हात, दोन पाय, एक मुख, एक मूत्रद्वार व एक गुदद्वार अशी सात कर्मेंद्रिये आणि पंचप्राण, चैतन्य व अहंकार या सात. अशा २१ समिधाद्वारा मनुष्य हा यज्ञ जितका उत्तम करील, तितकी उत्तम सिद्धि त्याला प्राप्त होईल. अशा रीतीने यज्ञकर्म सुरू राहिले म्हणजे ' यज्ञेनयज्ञमयजन्त... साध्या: सन्ति देवा. ' असे यज्ञकर्म जे करतील ते सुखी होऊन सुखस्थानी राहतील. अशा यज्ञांत श्रेष्ठांचा सत्कार, आपसांत संगठन आणि गरिबांना सहाय्य, ही तीन मुख्य कर्मे करावयाची असतात. व ती पूर्वी होत.

देवपूजा—संगतीकरण व दान हे यज्ञाचे त्रिविधस्वरूप ज्ञानी, पुरुषार्थी व व्यवहारदक्ष यांचा सत्कार, ही देवपूजा, राष्ट्रनिवासियांचे संघटन करण्याने राष्ट्राची शक्ति वाढते आणि ज्ञान, बल, धन या कार्यशक्ति यानी जे निर्बल असतात, त्याना ते ते सहाय्य देऊन त्यांचे निर्बलत्व दूर करणे हे दान—ही तीन कार्ये केल्याने यज्ञसिद्धि मिळते, हा सोळाव्या सूक्ताचा इत्यर्थ आहे.

सारांश, एवढ्या व्यापक दृष्टीचे पुरुषसूक्त हे पंचायतन पूजेतील इतर देवतांनाही अभिषेक समयी योग्य व उपयुक्त कां होते, ही गोष्ट ध्यानात येईल व त्या सूक्ताचे श्रेष्ठत्वही पटेल असे वाटते

पूजेमधील पुरुषसूक्तापेक्षा निराळ्या ऋचांचे ' पुरुषसूक्तविधान ' व पुरुषसूक्त व होम व यज्ञ विधान ही असून, ते सतानप्राप्तीसाठी आहे पुरुषसूक्तातील्याही मंत्राचे अन्य उपयोगही आहेत.

या पुरुषसूक्तांत चातुर्वर्ण्याच्या मूळस्वरूपाचे पण चिंतन टिकाऊ अशी मांडणीही केलेली आहे पण ती यथे देणे अप्रस्तुत आहे

## पुरुषसूक्ताची एकादशिनी

ऋग्वेदीय १६ सूक्ते १६ वेळा म्हटल्याने किंवा नारायण अथर्वशीर्षाची १६ आवर्तने केल्याने, विष्णूदेवतेची एकादशिनी होते. ११ वेळ सूक्त म्हणणे, हा शब्द मुख्यत: शंकर देवतेच्या—रुद्राच्या— अशा आवर्तनाला लावितात

# श्रीसूक्त

**अभ्युदय हेतु-प्रधान श्रीसूक्तविधान परिचय—**
**पंचायतनांतील देवीपूजेसाठी.**
**श्री देवीप्रमुखपंचायतन**



**वेदोक्त वाङ्मयांतील स्थान व हेतू—**

श्रीसूक्त हें पंचायतनपूजेंतील इतर सूक्तांप्रमाणें वेदोक्तच आहे पण त्याचा मुख्य हेतू ' अभ्युदय ' हा आहे कारण त्याचें स्वरूप म्हणजे, त्या सूक्ताचा अर्थ, अभ्युदय प्राप्ति हाच आहे पंचायतनांतील देवीची पूजा वा अभिषेक श्रीसूक्तानेंही केला जातो

## श्रीसूक्तसंख्या

श्रीसूक्ताची संख्या पंधरा आहे, हें प्रारंभीच दिलें आहे जसें ' हिरण्यवर्णामिति पंचदशर्चस्य सूक्तस्य ' असें आहे परंतु १६ वे सूक्त म्हणजे श्रीसूक्ताच्या १५ सूक्तरूपी प्रार्थनेचा फलश्रुतियुक्त हेतु आहे तथापि यापुढें आणखी नऊ सूक्तें व नंतर उपनिषदांतील लक्ष्मी–गायत्रीची दोन वा तीन सूक्तें मिळून २८ सूक्तें होतात [1]

## श्रीसूक्त एकादशिनी

या बाबतींत १२, १५ वा १६ आवृत्त्यांनी एकादशिनी होते, अशी भिन्न मतें असून तशी आवर्तनें होतातही गणपती अथर्व–शीर्षांत ज्याप्रमाणे फलादेशापर्यंतच एकवीस आवर्तनें करून शेवटी पुढील सर्व फलादेश एकदाच म्हणावयाचा म्हणजे एकादशिनी पूर्ण होते, तद्वतच् श्री–सूक्ताची–१६ सूक्ताची १२ वा १५ आवर्तनें करून मग पुढील सर्व सूक्तरूपी फलादेश एकदाच म्हणावयाचा म्हणजे श्रीसूक्त एकादशिनी होते, असा परिपाठ आहे तथापि पूजेतील अभिषेकमात्र दशावृत्तीनेंच करावयाचा

## श्रीसूक्त बीजें

श्रीसूक्तातील ' पद्मानने पद्मऊरु या सूक्तापर्यंत पहिल्या सर्व सूक्तांना ' ॐ ' हे बीज आहे पण औदुंबरस्य ब्रह्मवृंदामध्यें प्रचलित व रंगावधूत

---

१ प० चित्रावशास्त्री यानीं २८ सूक्तें मानून त्याचा अर्थ दिला आहे प० सातवळेकर यांनी फलादेशरूपानें " श्रीवर्चस्वमायुष्य शतसंवत्सर दीर्घमायु " ही २९ वावी ऋचा ( सूक्त ) दिली आहे पण विद्याविनोद नारायणशास्त्री जोशी ( आजर्लें ) यानी १५+१० सूक्तें + ३ लक्ष्मी गायत्री रूपी तीन सूक्तें दिलीं आहेत श्री चिंचवडेकरशास्त्रीच्या श्रीसूक्तांत एकूण २९ च सूक्तें आहेत सिद्धयोगी रंगावधूतमहाराजांनीही तेवढींच सूक्तें आहेत

महाराजाच्या टेंबेस्वामी परंपरेंतही औदुंबरस्थ ब्रह्मवृंदाप्रमाणेच प्रत्येक सूक्ताला भिन्न भिन्न बीजे असलेली श्रीसूक्ते पाठित व अनुष्ठानित केली जातात. *

## श्रीसूक्ताचें स्वरूप

श्रीसूक्तोपासना ही शीघ्र फलदायी आहे, असा निर्वाळा 'सप्रत्ययं मया प्रोक्तम्' प्राचीन ऋषी देतात. अर्थात् त्याचे अनुष्ठान, जप संकल्प, प्रारंभ इत्यादि बाबतीत निर्बंध आहेतच व ते असणे योग्य व जरूरच आहे तंत्रमार्गासह अनुष्ठान व केवळ वैदिक मंत्रानुष्ठान यापैकी वैदिक पद्धतीच मंत्रानुष्ठानानेही इष्ट फल मिळतेंच पण प्रमाद घडला तरी दोष उत्पन्न होत नाहीं. पण तंत्रयुक्त अनुष्ठानात प्रमाद इष्ट फलाच्या दृष्टीने क्षम्य नसतो, हें ध्यानात घ्यावे

## परिचय

श्री-सूक्त म्हणजे लक्ष्मीसंबंधाचे, लक्ष्मी मिळविण्यासंबंधाचे विचार ह्या सूक्तात श्री म्हणजे लक्ष्मी हिची अति उच्च विचाराची, तिच्या श्रेष्ठ वैभवाची तिच्या अमोघ व अतुलनीय सामर्थ्याची पूर्ण कल्पना दिलेली आहे शंकर, विष्णु, गणपती अथवा देवी ह्यांच्या उपासनेंत रुद्र, पुरुषसूक्त, अथर्वशीर्ष किंवा सप्तशती ह्यांना जें महत्त्व व स्थान आहे, तेंच स्थान लक्ष्मीच्या म्हणजे देवीच्या उपासनेंत श्रीसूक्ताला आहे. त्या त्या उपासना-सूक्ताची जशी विधिविधानें व होमहवनादि तन्त्रें आहेत, तशी श्रीसूक्ताचीही आहेत एवढेच नव्हे तर इष्टकामनासिद्धीसाठी श्रीसूक्ताच्या प्रत्येक सूक्ताची यंत्रें असून त्या यंत्राची म्हणजे देवताप्रतीकाची प्राणप्रतिष्ठादिकृतियुक्त

---

* पण ही भिन्न भिन्न बीजें असलेली श्रीसूक्ते ('मन्त्रशास्त्र-' १९७० आवृत्ति- नवज्योती प्रकाशन-दादर, मुंबई २८ या ग्रंथात पृ० ३५१, ३५३ दिलेली आहेत ) २६ असून तीन लक्ष्मीसूक्तेंही दिलेली आहत येथें ह्या सर्व प्रकाशित श्रीसूक्तात काही ठिकाणी स्वरभिन्नता आहे.

होमहवनादि कृतीसह उपासनाही आहेत ही साधी म्हणजे-तत्रमत्र युक्त नव्हे अशी सूक्तपारायणात्मक कृतीची उपासनाही सद्य फलदायी म्हणजे अल्पावधी कालाची ( सोळा दिवसातील अनुष्ठानाची ) आहे त्यालाही आज्य द्रव्ययुक्त प्रत्यृच हवन करावे लागते या मध फलदायी अनुष्ठानाचा अनुभव वा प्रत्यतर उपासकाच्या वैयक्तिक पूर्व सुकृत इत्यादि गोष्टीवर अवलबून असते, हे पण ध्यानात असावे

श्री म्हणजे धन, सपत्ती हा अभ्युदयाचा मूलाधार आहे पधरा ऋचाचा ( सूक्ताचा ) हा सग्रह म्हणजे लक्ष्मीची आळवणी, लक्ष्मीचा प्रार्थना, मनोभावाने म्हणजे तिला पूर्ण शरण जाऊन केलेली म्हणजे लक्ष्मी मातृवत् प्रसन्न होते आईची केलेली मनधरणी आईजवळ मागितलेले मागणे हे कधीच फुकट जात नाही आई बालहट्ट पुरवितच पण केव्हा ? अनन्यभावाने बालक तिच्या गळी पडते तेव्हाच सारांश ही श्रीसूक्तरूपी प्रार्थना टिकाऊ व अद्वितीय उच्च व्यावहारिक वैभवाची काम्य प्रार्थना आहे अशा या श्रीसूक्ताचे नित्यपठनही अडचणी वा सकटे यांचे निवारण, तसच दुःख परिहार, सुखप्राप्ती वा समाधान देणारे आहे, हें अनुभूत व अनुभाव्य सत्य आहे विवहुना श्रीसूक्तयत्र ( ताम्राव ) करवून त्याची प्राणप्रतिष्ठा करुन केवळ ते यत्र नित्यपूजेत घेऊन त्याची पूजा करीत असले तरीही अनेक अनिष्ट व अरिष्ट टळतात, असा अनुभव येतो सामान्य अडचण वा सकट निवारणासाठी पधरा ऋचाची १०८ पारायणे व शवटी फलादेशरूपी उरलेली सर्व एकदा म्हणावी हे पाठ ३-४ दिवसात ठराविक जागी ठराविक वेळी करा व अनुभव घ्या

## काही श्रीसूक्तांचा काम्योपयोग

( १ ) सपत्तिप्राप्तीसाठी— ' ॐ का सा-स्मिता ह्वय श्रियम ' ह्या सूक्ताचा रोज दोनहजार जप असे आठ दिवस करणे नित्य हजार पाठानतर घृताक्त अन्न किंवा त्रिमधु ( दूध, दही व मध ) ह्या द्रव्याच्या अकरा आहुती हवन पात्रात द्याव्यात

( २ ) विविधविद्याप्राप्तीसाठीं— ' ॐ का सोऽस्मिताम् ' या सूक्ताचा आठलक्ष जप, रोज हजार, शुक्रवारी तीन हजार गोघृताक्त पलाशसमिधाचे हवन ' श्री ऐं ' या पल्लयाने न्यास व ' वरदाभयाङ्कुश कल्ये । कमला सस्मितवदना वाचित, ह्या ध्यानाने अनुष्ठान करावे.

( ३ ) संततिप्राप्त्यर्थे— ' कर्दमेन प्रजाभूता पद्ममालिनीम् '— ह्या ऋचेचा पद्माक्षमालेने १ लक्ष जप व ' श्रीव ' हा न्यास

[ ह्या दोहोंबद्दल जास्त माहिती ' श्रीसूक्तविधानम् ' या नारायणशास्त्री जोशी आजलेंकर ह्याच्या ग्रंथात पहावी ]

( ४ ) अन्नसमृद्धिसाठीं— ' ॐ आर्द्रां पुष्करिणी ' किंवा ' ॐ आदित्यवर्णे ' ह्या ऋचेचा जप

( ५ ) संपत्तिप्राप्तीसाठीं— ' ॐ क्षुत्पिपासा ' किंवा ' ॐ कर्दमेन ' ह्या सूक्ताचा जप–हवनइत्यादि

( ६ ) यशोवृद्धीसाठीं— ' ॐ उपैतु मा ' ह्या ऋचेचा जप–पाठ–हवन इ० [ ह्या तीनही हेतूसाठी जास्त माहिती ' मंत्रशास्त्र ' १९७० आवृत्ति, नवज्योति प्रकाशन, दादर मुंबई २८ यात पहावी ]

## श्रीसूक्त यंत्रे व उपयोग

वर सांगितल्याप्रमाणे श्रीसूक्ताच्या प्रत्येक ऋचेचें यंत्र असून त्या प्राणप्रतिष्ठित यंत्राची ठरावित सूक्त म्हणून उपासना– जप–हवनादि कृतीने केली तरीही अनेक प्रकारचे लाभ होतात. सारांश, श्रीसूक्तोपासना ही बहुफलदायी व सद्य फलदायिनी आहे ह्याचा अनुभव घ्यावा. मंत्रशास्त्र या ग्रंथात पृ० ३६२ व ४७८ वर दिलेल्यापैकी कोणतेही एक यंत्र * प्राण-

* या पुस्तिकेत दिलेले श्रीसूक्त यंत्र अनुभूत असे प्रासादिक आहे

प्रतिष्ठा करून नित्य पूजेंत ठेवून भक्त्या करून अनुभव तर घेऊन पहा. कोणत्याही उपासनेमुळें उपासकाच्या पचभौतिक शरीरातही मनस्पंदनोद्भूत आकर्षणशक्ति– इतरांना ओढून घेण्याची शक्ती म्हणजे चुंबकीय शक्ति वाढते. सात्त्विक उपासनेमुळें ही चुंबकीय शक्ति ( आकर्षणशक्ति ) उपासकाच्या चेहऱ्यावर पूर्ण तेजानें दिसू लागते, असे अनुभवी लोकही आहेत.

## श्रीसूक्तांतील अध्यात्म

' मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयोः ' व ' संकल्प-विकल्पात्मकं मन ' ह्या दोन सूत्रात ' मन ' या वस्तूचे स्वरूप व लक्षण सांगितले आहे अशा या मनाला सुचवाकून समर्थांनी ' मनाचे श्लोक ' रचून त्याला अध्यात्माकडे कसे वळवावे, हे सांगितले. या मनाचा संबंध बुद्धीशीं, बुद्धीचा आत्म्याशी, आणि आत्म्याचा परमात्म्याशी असा संबंध या सर्व येतो इंद्रियांची सहज बाह्य प्रवृत्ति मन प्रचोदित असते ती अन्तर्मुख होण्यासाठीं काही आमिष लागतें श्रीसूक्तात जी भौतिक ऐश्वर्याची प्रार्थना केलेली आहे, तिचा संबंध मनाशी आहे. सोळाव्या श्रीसूक्तात तें ऐश्वर्य प्राप्त करून घेण्यासाठीं ' य शुचि प्रयतो भूत्वा ' ही अट मनाला घातलेली आहे शुद्ध मनानें सूक्ताचा जप करून नित्य हवन करावे म्हणजे तें ऐश्वर्य मिळेलच असे आश्वासन दिले आहे त्यामुळें मन ध्येयप्रेरित होऊन अन्तर्मुख होण्याच्या मार्गाला लागते तें तसे एकाच ठिकाणी संपूर्ण संबद्ध बनतें म्हणजे तें इतर कशाचीही अपेक्षा ठेवीत नाही एकदा अशी निरपेक्ष शुद्धता मनाला प्राप्त झाली म्हणजे तें आत्मारूप केंद्राकडे आकर्षित केले जाते आणि अशा सकामातून निष्काम स्थिति प्राप्त झाली की, ' मन शुद्धी आत्मशुद्धि ही अवस्था येते श्रीसूक्तातील शब्दमाधुर्य, भावसौष्ठव ह्यांवर लक्ष्यार्थे स्थित उपासकाचे मन, विलीन होऊन अखेरीस स्थिरावतें. अशारीतीनें स्थिरावलेलं मन म्हणजे अखेरची ' अहं ब्रह्मास्मि ' ही स्थिति प्राप्त होते तशा स्थितीप्रत पोचलेल्या लक्ष्मीच्या उपासकाकडे भौतिकी अभ्युदयी लक्ष्मी तर येतेच पण त्याबरोबर सर्व जीवांना आकर्षून घेण्याची शक्ति ही त्याच्या पंचभौतिक देहाचा एक उज्ज्वल भाग किंवा पैलूच झालेला आढळतो

## श्रीसूक्तान्तर्गत वैज्ञानिक संकेत

इतर सूक्ताप्रमाणे श्रीसूक्तातही विज्ञान म्हणजे विज्ञानी दृष्टीचे सखोल ज्ञान भरलेले आहे. पण ते सांकेतिक शब्द वा उपमादर्शित शब्दांनी व्यक्त केलेले आहे. कारण ह्या सूक्ताचे उद्दिष्ट व्यावहारिक अभ्युदयोपयोगी 'लक्ष्मी' म्हणजे वैभव व त्याचा आधार धन, दौलत वा संपत्ति व वैभव हा आहे यामुळें या सूक्तातील लक्ष्मीसंबंधीचे वर्णन, तिचे स्वरूप व तिजमधील सर्व प्रकारच्या शक्ति ह्याची अर्थगर्भित वर्णने आहेत. ह्यात जी शब्दरचना केलेली आहे, त्यातील अनेक शब्द आधुनिक विज्ञानापेक्षाही श्रेष्ठ विज्ञानाचे दर्शक आहेत. व तशा अर्थगर्भित विज्ञानाची सांगड अभ्युदयहेतुक लक्ष्मीशी घालून दिलेली आहे. म्हणून अशा काही सांकेतिक शब्दांचे व त्यातील विज्ञानाचे ईषद्दर्शनच येथें करणे योग्य व समयोचित होईल म्हणून त्याकडे वळतो.

( १ ) सूक्त ४ यातील 'आर्द्रां, कांम्, पद्मवर्णाम्' हे शब्द भारतीय-ऋषींच्या वैज्ञानिक ज्ञानाचे अर्थगर्भित आहेत जसे— 'क' म्हणजे ब्रह्म-ब्रह्मांडात भरून असलेली शक्ति. विश्व व त्याची भारतीयांची कल्पना तेव्हां केवढी होती हे यात गर्भित आहे आर्द्र म्हणजे ओली दयेमुळें ओली व आर्द्रानक्षत्रावर जन्मलेली, न-क्षत्र म्हणजे न तुटणारी, न संपणारी म्हणजे अक्षय्य टिकाऊ अशी. नक्षत्रें ही अफाट अवकाशात म्हणजे वैश्विक पोकळींत आहेत त्यातूनच उत्पन्न झालेली इ० १३ व्या व १४ व्या सूक्तातही 'आर्द्रां' हा शब्द आलेला आहे [ तेथें करुणामयी असा गर्भितार्थ आहे. ] शेषशायी विष्णूंचे चित्र फार फार विज्ञानी अर्थगर्भित आहे क्षीरसागरात राहणाऱ्या विष्णूच्या म्हणजे स्थिरशक्तीच्या पायाशीं सेवारत अशी लक्ष्मी त्या चित्रात आहे पद्मवर्णां * व १३ व्या ऋचेतील 'पिंगलां' हा रंगाचा वर्णन भारतीय

* सदरहु चित्र फार अर्थगर्भित आहे. विष्णुरूपी स्थिर व सर्वाधार शक्तीची सेवाभावी योजना विष्णूच्या पायाशींच आहे. चंचल अशी लक्ष्मी योग्य कामास लाविली तरच ती नेहमी पायाशीं सेवातत्परतेने उभी असते.

दृष्टीच्या सखोल रंगविज्ञानाची द्योतक आहेत अजिंठा लेण्यातील टिकाऊ व सगनीकरणात्मक रंगविज्ञान हे अजूनही पाश्चिमात्य रंगविज्ञानाला मोहित करणारे आहे

( २ ) १३ व्या सूक्तातील 'यः करिणीम्' 'यष्टिम्' या शब्दातही व्यावहारिक विज्ञान आहे ते असे ती दण्डधारी ( यष्टिम् ) अशी आहे. लक्ष्मीचा म्हणजे धनाचा असयमी उपयोग करू नये व तसा केला तर त्याला लक्ष्मीच 'दण्ड' दाखवून शासन केल्याशिवाय राहणार नाही, या निघून जाईल हा संकेत आहे

( ३ ) ६ व्या सूक्तातील 'वृक्षोऽथ बिल्व' यात बेलाच्या झाडाचा महिमा विज्ञानयुक्त आहे तो असा– केवळ फळेच देणाऱ्या वृक्षालाच 'वनस्पती' हा शब्द लावतात यावरून त्या भारतीयांचे 'वनस्पतिशास्त्र' कोणत्या स्वरूपात सिद्ध झालेले होते, हे सूचित केले आहे बिल्व वृक्षाला 'श्रीवृक्ष' व फळाला 'लक्ष्मीफल' असे म्हणतात ते का? बिल्वपत्र व फल ह्यांचा आरोग्यशास्त्राशी असलेला घनिष्ट * संबंध, 'अपर्णा म्हणजे पार्वती म्हणजे अलक्ष्मी, हिने बिल्व वृक्षाखालीच वा बिल्ववृक्षाशेजारी बसनच त्याचीच शुष्कपर्ण खाऊन तपस्या केली आणि अशा रीतीने इष्ट साध्य करून घेतले असा हा 'बिल्ववृक्ष' हे अभ्युदय–निःश्रेयसाला जोडणारे तत्त्वज्ञान गर्भितार्थाने सांगितलेले आहे एवढेच नव्हे तर 'तस्य फलानि तपसा, वाह्या अलक्ष्मी नुदन्तु' अशी प्रार्थना केलेली आहे *

* पूजासाहित्यामधील विज्ञान ह्या वर्णनात बिल्वपत्र व 'रुद्राक्ष' ह्या वर्णनात आरोग्याशी संबधित अशी माहिती दिली आहे. अनेक मन बिल्व-

[illegible]

मोदुवर यांचे उपासना व होम हवन ह्यातील स्थान, तसेच त्याचा आयुर्वेदीय

श्रीसूक्तातील वरील सांकेतिक शब्दात असे विज्ञानगर्भित अर्थ आहेत एवढेंच ध्वनित वा सूचित करावयाचे आहे. अशा या श्रीसूक्तात याप्रमाणे आणखीही विज्ञानगर्भित अर्थाचे वरेच शब्द आहेत, हे ध्यानात ठेवले म्हणजे आमच्या देवपूजेतील सूक्तें केवढ्या मोठ्या योग्यतेची आहेत, हे ध्यानात येईल.

श्री सूक्तातही पुरुषसूक्ताप्रमाणे समष्टिरूपाची म्हणजे समाजाची सर्व प्रकारची व्यावहारिक अभ्युदयी उन्नती व्हावी या हेतूनें देवीची प्रार्थना आहे. जसे सूक्त ७ यात ' प्रादुर्भूतोऽस्मि राष्ट्रेऽस्मिन् कीर्तिम् ऋद्धिं ददातु मे ॥७॥ ' माझ्या सर्व राष्ट्रांत पुरून उरेल इतकी कीर्ति व ऋद्धि मागितलेली आहे. सारांश, या श्रीसूक्तामध्येंही समष्टिदृष्टि कायम आहे. लक्ष्मीला राष्ट्रमाता असेही म्हटलेले आहे ❀

देवीपूजोपासनेसाठीं आणखीः— देवीअथर्वशीर्ष व देवीसूक्तें

## देवी अथर्वशीर्ष

पचायतन पूजेंतील म्हणजे ' देवीप्रमुख ' पचायतन पूजेंतील देवीपूजन करिताना श्रीसूक्ताप्रमाणे देवी अथर्वशीर्षाच्या पठनाने पूजा वा अभिषेक करिता येतो व करितातही या अथर्वशीर्षाची २५ सूक्ते असून त्यानंतर गणपती अथर्वशीर्षाप्रमाणे फलादेश आहे. हे १०८ वेळा जपिले म्हणजे पुरश्चरण होतें

## देवीचें स्वरूप

' अहं ब्रह्मस्वरूपिणी मत्त ( माझ्यापासून ) प्रकृति पुरुषात्मक जगत् । अहम् अखिल जगत् ' असे तिचे स्वरूप तिने देवाना सांगितलेले आहे

---

उपायांशी संबंध, त्या त्या वृक्षाच्याच समिधांचा अनेक काम्य होमहवनाशी जोडिलेला संबंध, इत्यादि गोष्टींवरून आमचे भौतिक व आधिदैविक विज्ञान किती खोल, दूरदर्शी व प्रगत होते याची कल्पना येते.

❀ तसेच देवीला ' प्रजानां माता ' असेही म्हटले आहे

## देवीसूक्तें

यात ऋग्वेदोय सूक्ते आठ आहेत व तन्त्रोक्त देवीसूक्तें ३० आहेत देवी अथर्वशीर्षाप्रमाणे देवीसूक्तानींही महाभिषेक करतात

## सप्तशती

सप्तशती* म्हणजे ७०० मंत्राचा समुदाय हा देवी उपासनेचा गाभा आहे या उपासनावाचयांत देवीअथर्वशीर्ष व देवीसूक्तें याचे पठन करावेच लागते. पण पचायतनपूजेंतील ' देवी ' ही सात्विक लक्ष्मी आहे सप्तशतीमधील त्रिविध स्वरुपाची देवी नाही. यामुळें श्रीसूक्तानीच तिचा अभिषेक करणे जास्त चागले व योग्य

## विज्ञान

अखिल विश्व ज्या शक्तीमुळें अस्तित्वात आढळते, त्या शक्तीचे एक स्वरूप म्हणजे ' देवी.' हीच ती देवतापचायतनरूपी ' पावरहाऊस ' मधील एक मुख्य शक्ति

## एकादशिनी

देवी अथर्वशीर्षाची ११ आवर्तनें म्हणजे तिची एकादशिनी होते



* सप्तशती उपासना– ' मंत्रशास्त्र ' १९७० आवृत्ती नवज्योती प्रकाशन, दादर-मुबई २८ यांत उत्तरार्ध प्रकरण ५ मध्यें पूर्ण माहिती दिली आहे.
×

# सौर परिचय

### दैविक तेजाच्या सूर्यरूप प्रतीकाची वर्णनें–सौर सूक्तें

### सौरसूक्तसंख्या व एकादशिनी

श्रीसूक्ताप्रमाणे सूर्यनारायणाच्या पूजेची 'सूर्यनारायणप्रमुख देवतापंचायतन' असेल तेव्हा–प्रथम सौरसूक्ते (सूर्यनारायणाची जी सूक्तें तीं) म्हणून मगच अभिषेक स्नान संपवावयाचे असतें 'उदुत्यम् इति त्रयोदशर्चस्य सूक्तस्य' असा सौर सूक्ताचा प्रारंभ आहे ऋक्संहितेमध्यें निरनिराळ्या मंडलांत सूर्यस्तुतीपर जे मंत्र आहेत, त्यांचे एकत्रीकरण करून त्याला प्राचीन-ऋषींनी 'सौरसूक्त' असे नाव दिले याचे एकूण बारा वर्ग (अनुवाक्) असून 'ऋतं चेति' हा शेवटचा वर्ग (परिशिष्ट) जोडिला म्हणून त्याचे तेरा वर्ग झाले आहेत

'उदुत्य' पासून 'प्रतिवत्सोरहपुभि' पर्यंत एक आवर्तन होतें अशीं बारा आवर्तनें म्हणजे एक एकादशिनी होते

## सौरतेजाचे परिणाम व उपयोग

एवढेच नव्हे तर या वैदिक सौर तेजःशक्तीमुळे पृथ्वीरूपी जगातीलच नव्हे, तर अखिल विश्वातील सर्वप्रकारची हालचाल व जिवतपणा होत असतो व राहतो या शक्तीमुळेच सर्व प्रकारची सृष्टि ( सृज्–उत्पन्नकरणे, उत्पन्नहोणे, वाढणे वा प्रसृतहोणे ) दिसते व टिकते असे वर्णनही या सौर-सूक्तात आहे अहोरात्र वा अयनें होणे या क्रिया सर्व अवकाशस्थित म्हणजे अंतरिक्षस्थित ग्रहोपग्रहादि सृष्टीला लागू आहेत असे वर्णन पण १३ व्या सौरसूक्तात आहे सौरसूक्तांत अशी व्यापक दृष्टीची मांडणी असूनही 'हृद्रोग मम सूर्य हरिमाणं च नाशय' असे दुसऱ्या सूक्तात व तृचाकल्प नमस्कारात 'जीवेम शरदः शतम्, पश्येम शरदः शतम्' असे सातव्या सूक्तांत आहे त्याचप्रमाणे ६ व्या सूक्ताच्या अखेरीस 'सूर्य वहति हरितो रथे' असे वर्णन आहे ❀ या सर्वांत आधुनिक विज्ञानापेक्षाही श्रेष्ठ असे भौतिक विज्ञान भरलेले आहे हे सात हिरवे अश्व यात पृथक्करण झालेले किरण रंग आणि सूर्यकलांना सूर्यकिरणांच्या गुणाप्रमाणे मिळालेलीं नावे याशी संबंधित असे विज्ञान आहे [ पहा–मंत्रशास्त्र पृ० ३६८ व ३६९ ] सूर्यकिरणातील सप्तरंग–याचे आमचे सूत्र 'तानापिहिअनिजा' व पाश्चिमात्यांचे ~~Vibgore~~ Vibgyor यात श्रेष्ठ व योग्य कोणते ?

## सौरोपासना व आधुनिक विज्ञान

पश्चिमेकडील शास्त्रज्ञांनी नवीन शोध म्हणून उचलून धरलेल्या आजच्या भौतिकी नवविज्ञानाप्रमाणे सूर्यकिरणजन्यचिकित्सा ह्याचा उपयोग काही

❀ सूर्यार्यास्तोत्रांत 'हरितहय हरितपरिकरगगनागदीपक, नमस्ते' ( मन्त्रशास्त्र पृ० २८९ ) व नवग्रहोपासनेतील सूर्यध्यानात 'सप्तद्वारुण-ध्वजपताकोपशोभितेन सप्ताश्वरथवाहनेन मेरु प्रदक्षिणा कुर्वन्' असे वर्णन आहे ( मन्त्रशास्त्र पृ० ३८१ ) तृचाकल्पनमस्कारातही 'सप्ताश्व सप्त-रज्जुश्च अरुणो मे प्रसीदतु' असे आहे सूर्याच्या आरतींत 'वनकाकृति रथ एक चक्रांकित तरणी । सप्तानन भूषितरथि बैसोनी' असाच अनुवाद आहे

शारीरिक रोगोपशमासाठी केलेला आहे एवढेंच नव्हे तर पृथ्वीवरील ज्या भूभागात वर्षाकाळीं अल्पकाळपर्यंतच सूर्यकिरण मिळतात, त्या भूभागातील लोक त्या त्या काळांत व भूभागात शरीरारोग्याला फायदा मिळावा म्हणून घडपडत असतात, परंतु प्राचीन आर्यांनी उघडया अंगानें सूर्यनमस्कार घालण्याची प्रथाच ठेविलेली आहे प्रकृतिस्वास्थ्य व सुलभप्रसूति यासाठी आठव्या महिन्यापर्यंतही सूर्यभेदनपद्धतीचे नमस्कारही घालावे असें सुचविलेले आहे एवढेंच नव्हे तर कांतिमान् अपत्यसंभव, पचनसुधार, अस्थिकमजोरी ( रिकेट्स् ), बुद्धिमत्तावाढ, दीर्घायुष्य इत्यादि गोष्टींसाठी ताम्रपात्रजलातील सूर्यकिरण यांचा कसा कोणत्या प्रकारें उपयोग करावयाचा याचें मंत्रयोजित शास्त्र बनविलेलें आहे ' सूर्यकवच ' व त्याचें न्यासयुक्त पाठ, हें रसायनाचें शास्त्र असून ' आदित्यहृदय ' ही पाठोपासनाही तयार केलेली आहे एवढेंच नव्हे सूर्यादिग्रहोपयोगी रत्नधारण व जपजाप्यादि क्रियांचे शास्त्र बनवून ठेविलेले आहे !

## अंतरिक्षीय नवविज्ञान व प्राचीन भारतीय ज्ञान

सौरशक्तीचा म्हणजे सूर्यकिरणोद्भूत उष्णतारूप शक्तीचा उपयोग अवकाश शोधन यंत्रासाठीं इन्धन म्हणून अलीकडे केलेला आहे फ्रान्समध्यें तर अशी एक प्रचंड भट्टी तयार केलेली आहे विषुव वृत्तीय वा उष्ण कटिबंधिय भूभागामध्यें अतिशय मोठी सौरशक्ति वाया जात आहे सध्यां तरी पश्चिमेकडील शास्त्रज्ञांना नवग्रहमालिकेतील सूर्यासंबंधीं फारच थोडें ज्ञान झालेले आहे कारण ते तें ज्ञान भौतिकी यंत्राच्या मदतीनेंच मिळवू पहातात परंतु सौरसूक्तातील ज्ञान आधुनिक नवविज्ञानापेक्षा कितीतरी व्यापक आहे तसेच सूर्योपासनेच्या आधारानें प्राप्त करून घेतलेले ' महाभारत ' कालात विदित असलेलें अस्त्रविज्ञान हें किती श्रेष्ठ व व्यवहारयुक्त होतें, तें इतिहास सांगतो या शिवाय सध्या भारतात सहज उपलब्ध नसलेले संदर्भग्रंथ म्हणून उल्लेखिलेले अंशुबोधिनी ( भरद्वाजप्रणीत ) वायुतंत्र ( शाकटायनप्रणीत ) शक्तितंत्र ( महर्षि अगस्त्य प्रणीत ) इत्यादि ग्रंथ ( याच्या विषयाबद्दल जास्त माहिती ' मंत्रशास्त्र ' १९७० पृ० ३६८–३६९ व पृ० ५०७–५०८

यर आहे ) यांतील माहितीप्रमाणे नवग्रहमालेतील सूर्य, त्याचा प्रकाश, तेज, किरण इत्यादिकांच्या उपयोगाची माहिती आधुनिक शोधांपलीकडील व जास्त सूक्ष्म स्वरूपाची दिसते. सौरसूक्तांतील काही वर्णन त्या आधुनिक माहितीशी संबंधित वाटतें.

सायणाचार्यांच्या मताप्रमाणे ( सुमारे सातहजार वर्षांपूर्वीचे सूर्यासंबंधीचे ज्ञान ) ' सवितृ ' हा शब्द उदयापूर्वीच्या सूर्याला, ' सूर्य ' हा शब्द उदयानंतरच्या सूर्याला आणि ' भग ' हा त्यानंतरच्या अधिकाधिक तेजोभागाला लावितात. वस्तूचे नेमके व स्पष्ट ज्ञान झाल्यानंतरच तें तदर्थबोधक शब्दानें व्यक्त केले जातें. ज्याला सामान्यतः सूर्य असें म्हणतो त्याचे ' सूर्यपृष्ठ ' ( अत्यंत तेजस्वी प्रकाशमान भाग ) वर्ण मंडल ( सूर्य पृष्ठापासून सुमारे ३ ते ५ हजार मैलांचा भाग ) आणि प्रभामंडल ( हा अगदीं बाहेरचा भाग ) असे तीन भाग असून त्यांचें वर्णन उदक, तेज, जिव्हा, प्रकाशाचे तरंगायाम, अणुभंगप्रक्रिया इत्यादि उत्तम माहिती ऋग्वेदमंडल सूक्तें १४०—१४१ यांत आहे. एवढेच नव्हे तर त्या मंडलात पृथ्वीचे वजन, सूर्याचे वजन, त्याची उष्णता तसेच निरनिराळ्या ताऱ्यांचे रंग व त्यांची कारणे व ताऱ्यांची संख्या इत्यादि वर्णन आहेत. सूर्यासंबंधीच्या अनेक गोष्टींची म्हणजे त्यावरील डाग, त्याचे त्यावर व इतर अवकाशावर होणारे परिणाम इत्यादि वर्णनें ' दीर्घतमस् व सूर्य ' —लेखक भैयासाहेब पंत इ. स. १९७० या ग्रंथात आहेत. सारांश, आमचे भारतीय व प्राचीन ज्ञान कशा दर्जाचे त्या प्राचीन काळात होतें व तें कोणत्या साधनांनी व पद्धतीनें त्यांनीं मिळविलें असावें ह्याचा विचार करा, आणि मग आजचे विज्ञान त्या मानानें कोणत्या दर्जाचे आहे हे ठरवा. पश्चिम जर्मनीचे शास्त्रज्ञ इतक्यातच सूर्यमंडलाचे स्वरूप, त्याच्या अग्निज्वाला इत्यादि शोध घेण्याच्या हेतूनें स्वयंचलित पण भूकेन्द्रसंचालित असे यंत्र पाठवू म्हणतात ( इ स. १९७२ मध्यें ) तसेच संशोधन रशियन शास्त्रज्ञ पण करू म्हणतात. यावरून भारतीय संस्कृतीतील ज्ञानाचा दर्जा ठरविण्यापेक्षा ते आकाशस्थ दिव्य तारकांचे, अशा

अनेक सूर्यग्रहमंडलाचे, वैदिकज्ञान काय आहे, त्याचे अध्ययन, संशोधन करण्याकडे नवीन दृष्टीने पहाण्याचा प्रयत्न करा म्हणजे भारतीय स्वत्वाची तरी जाणीव होईल. तसे घडेल तर सध्यां होणारी स्वत्वहीनकारी विज्ञान वेडी दिशाभूल टळेल. सूर्याच्या आरतीत नवग्रहमालिकेतील सूर्याच्या भ्रमण कालासंबधीं ' योजनसहस्र द्वे द्वे शतयोजन दोनी । निमिषार्धे जग आक्रमित अद्भुत तव करणी ' असा सहज केलेला उल्लेख आहे आमच्या वाङ्मयात हें केवढें विज्ञान भरलेले आहे ! ह्याचा विचार करून त्यात लक्ष घाला व तसे कराल तर पाश्चिमात्य शोधोद्भूत विज्ञानवेड कमी होऊन आम्हा भारतीयाजवळ काय आहे, ते ' जुनें ठेवणें ' तरी पहाण्याकडे दृष्टि वळेल, तर फार फायदा होईल.

विश्वरूप दर्शनामध्यें श्रीकृष्णानी जें वैदिक तेजाचे रूप दाखविले, त्याचे वर्णन ज्ञानेश्वर असे करितात– 'तैसे ते दिव्यसूर्य सहस्रवरी । जरी उदयती एकेचि अवसरीं । तरी तया तेजाची थोरी । उपमू नये ॥

सौरसूक्ते व ऋग्वेद त्यात वैदिकतेच्या दिलेल्या कल्पनेप्रमाणे आमच्या सूर्यमालेप्रमाणे एक हजार सूर्यमाला विश्वात असून त्या प्रत्येकांतील सूर्य हा त्या मोठ्या अशा वैदिक सूर्यतेजाची प्रतिबिंबें आहे ज्ञानेश्वराचा वरील उतरा काय सुचवितो ?

आपल्या चंद्राचा प्रकाश हा सूर्यतेजाचे प्रतिबिंब आहे असे तेच सांगतात.

आपली सूर्यमाला त्यातील सूर्याच्या शेंकडोपट मोठ्या महातेजस्वी अशा 'Antaris' 'अंतारिस' या ताऱ्याकडे मारत्वी ओढली जात आहे असे पाश्चिमात्य शोधक कबूल करितात !

# रुद्र परिचय

रुद्र : सर्वांचें सर्वप्रकारचें हित व संरक्षण करणारी शक्ति
शिव प्रमुख पंचायतन



## यजुर्वेदांतील सारभूत मंत्र

यजुर्वेद हा यज्ञप्रधान वैदिकसंस्कृतीचा मुख्य मंत्रसंग्रह आहे त्यामध्यें 'रुद्रसूक्तें' आहेत संहिताग्रंथ व सूत्रग्रंथ आणि पुराणे यांतही 'रुद्रा'–संबंधानें उद्बोधक माहिती आहे 'रुद्रोपनिषद्' या नावाचे एक स्वतंत्र उपनिषद्ही आहे. सारांश, वैदिकवाङ्मयात रुद्र वा रुद्रसूक्ते ह्यांना फार मोठें महत्वाचे स्थान आहे किंबहुना व्यष्टि, समष्टि, भौतिकजगत् व विराट् विश्व ह्या सर्वांचा आधार 'रुद्र' आहे. हे कसे ते पुढें ओघाने दिले आहे

